# नवभारत

एप्रिल - २०१६


— 'निळा सावळा झरा.....'

— शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक - ३

— समकालीन आव्हानांच्या
परिप्रक्ष्यातून शिवाजीमहाराजांचा विचार

— शेतक-यांच्या आत्महत्यांची कारणमीमांसा

-- परिभाषेचा प्रपंच

— जुने लेखन

— पुस्तक परिक्षण :
संवेदनालक्ष्यी कविता : उजेड गाभा-यातला











अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९। अंक ७। एप्रिल २०१६
फाल्गुन/चैत्र शके १९३७-१९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन - (०२०)२५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन - (०२१६७) २२०००६



अनुक्रमणिका








# नवभारत

## एप्रिल २०१६

## अनुक्रमणिका


**'निळा सावळा झरा..... '** — ३
माधवी देसाई

**शेती, शेतकरी आणि शासन – लेखांक २** — ११
श्री. के. वनपाल

**समकालीन आव्हानांच्या परिप्रेक्ष्यातून शिवाजीमहाराजांचा विचार** — १७
श्री. मा. भावे

**शेतक-यांच्या आत्महत्यांची कारणमीमांसा** — २४
बाबूराव चंदावार

**परिभाषेचा प्रपंच** — २८
सदाशिव आठवले
(एप्रिल १९६६ च्या अंकातून)

**जुने लेखन** — ३५
('सुधारणारहस्य' या लेखमालेतून)

**पुस्तक परिक्षण :**
**संवेदनालक्ष्यी कविता : उजेड गाभा-यातला** — ३७
अेकनाथ पगार

# 'निळा सावळा झरा ....'

माधवी देसाई

१. साहित्यकृती जिवंत कलाकृती असते; तिच्याशी आपण तसाच साहित्यव्यवहार करावा म्हणजे आपली समीक्षाही जिवंत आणि चैतन्यपूर्ण होते. जिवंत कलाकृती गुरू, मित्र, सखी अशा नात्यांचा आनंद देते.

२. मोठा कवी आयुष्यभर साथसोबत करतो.

३. मर्ढेकर आंतरिक अनुभूतीला सौंदर्य देतात. आंतरिक सौंदर्याच्या प्रतिमा दर्शनी सुंदर नसतात; पण अर्थाने सुंदर असतात.

४. मर्ढेकर अनुभवाबरोबर नवीन होतात; पण जी.ए. अनुभवाबरोबर नवीन होत नाहीत. कारण जी.ए. एक जीवनदृष्टी धरून त्या साच्यात अनुभव बसवतात.

५. जी.ए. पारिजातकासारखी प्रतिमांची पखरण करतात, पण ती फुले उबेने सुकतात. तसेच जी.ए. यांच्याकडे स्थिर जीवनदृष्टी आहे; पण साहित्यशास्त्रीय दृष्टी नाही.

६. सर्वपरिचित सुविचार सदोष पद्धतीने मांडणारे कवी खूप झालेत. घोषणावाक्यांच्या कविता झाल्यात.

७. 'माझी जन्मठेप' या सावरकरांच्य आत्मचरित्रास 'नोबेल' मिळावयास हवे.

८. पु. शि. रेगे, गंगाधर गाडगीळ यांना ज्ञानपीठ मिळावयास हवे होते.

अशी आणि इतकी परखड समीक्षा करणारे ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी म्हणजे मराठी साहित्याचा गेल्या बासष्ट वर्षांचा चालताबोलता इतिहास होता. समीक्षक प्रतिभावंत असावाच लागतो; त्याशिवाय त्याला अन्य साहित्यिक, कवींनी लिहिलेल्या साहित्याचा दर्जा आकळत नाही. आपल्या समीक्षेला नवनिर्मितीचा दर्जा आणणारे समीक्षक प्रतिभावंत असतात. 'दभि' सर असेच प्रतिभावंत समीक्षक होते. पाश्चात्त्य आणि भारतीय साहित्यशास्त्राचा त्यांचा गाढा व्यासंग होता. कोणताही वाङ्मयप्रकार असो; त्याच्या स्वरूपापासून इतिहासापर्यंतची सर्वंकष माहिती, त्या वाङ्मयप्रकारातील अस्सल कलाकृतींची नावे ते चटकन सांगायचे. या सर्वामागे त्यांची साहित्यसेवेची प्रदीर्घ तपश्चर्या होती. बालपणापासून जोपासलेली अन् जाणीवपूर्वक घेतलेली दृष्टी आणि दिशा होती. त्यांच्या विस्तृत, सुजाण व व्यासंगी वाचनाविषयी विचारले की ते म्हणत, "माझे बालपण अनुकूलतेत गेले. वाचनाचे-साहित्याचे संस्कार माझ्यावर माझ्या कुटुंबानेच केले. साहित्याकडे नेणा-या त्यांच्या वाचनसंस्काराविषयी ते लालित्यपूर्ण शब्दांत लिहितात, "…. आणि मग ग्रंथांच्या लाटाच्या लाटाच माझ्या अंगावर येत राहिल्या. संघ सुटला. गांधीवादी वाङ्मयाचे आकर्षण नाहीसे झाले…. दोनवेळचे जेवण सोडले तर बाकी सगळा वेळ ग्रंथालयात जाऊ लागला. ना मित्र, ना घरकाम, ना कॉलेजचे भान. मी ग्रंथांतून मानवी दुःखावरचे इलाज शोधत होतो… याची उत्तरं मला साहित्यात मिळत होती… तिथं जगाला आणि माझ्या अनुभवाला एक पूर्णता आणि विशालता येत होती."[१] म्हणूनच 'दभिं' हे प्रसंगवशात, दैववशात झालेले समीक्षक नव्हते, तर समीक्षा त्यांचा श्वास होता. त्यांच्या समीक्षेला प्रतिभासमीक्षेचा दर्जा होता. त्यांच्या समीक्षेविषयी डॉ.उषा देशमुख म्हणतात, " 'दभिं'ची समीक्षा मंत्राक्षराप्रमाणे आहे." तर भा. श्री. परांजपे यांनी 'दभिं'चा 'महाकवीची प्रतिभा असलेला समीक्षक' – अशा सार्थ शब्दांत गौरव केला आहे. 'दभि' सरांना सर्वच वाङ्मयप्रकार प्रिय होते; पण त्यांची समीक्षा कवितेवर अधिक प्रेम करणारी होती. कोणतीही कविता 'दभि' सरांशी बोलायची. कविता वाचली की, त्या कवितेचे अंतरंग आणि बहिरंग त्यांना उमगायचे. कवितेचे ताणे-बाणे त्यांना दिसायचे. मग ती कविता रेशमी की गभरेशमी, नितळ की जरतारी, मांजरपाट की सिंथेटिक हे ते सप्रमाण व सुंदर विवेचनाने सांगायचे. बा. सी. मर्ढेकर हे मराठी साहित्यातले वादग्रस्त कवी. दुर्बोध प्रतिमा,

अश्लीलता असलेली कविता या कारणांनी मर्ढेकरांना त्यांच्या हयातीत खूप त्रास दिला गेला. मर्ढेकरांचा समीक्षविचार ही मराठी साहित्यात लवकर रुजला-रुळला नाही; पण खुद्द मर्ढेकरांना स्वकविता व स्वसमीक्षाविचार यांबद्दल दृढ आत्मविश्वास होता. मर्ढेकरांच्या कवितेचे आणि समीक्षाविचारांचे अचूक मोल 'दभि' सरांनी जाणले होते. मर्ढेकरांची कविता, समीक्षाविचार त्यांनी भारतीय आणि पाश्चात्त्य साहित्यशास्त्राचे सखोल चिंतन, मनन आणि मंथन करूनच समजून घेतले व मर्ढेकरांच्या कवितेची दीर्घ समीक्षा केली. मर्ढेकरांची दुर्बोध प्रतिमासृष्टी ही आनंददायी व सुंदर प्रतिमासृष्टी आहे हे उलगडून दाखविण्यात 'दभि' सरांचे योगदान मोठे आहे, मर्ढेकरांच्या कवितेसंबंधी 'दभि' म्हणतात, "खरेतर मर्ढेकरी कवितेमध्ये निर्मितिप्रक्रियेची अविचल उत्कटता, अभिव्यक्तीची असाधारण नवीनता आणि निःशब्द आर्तता इतकी आहे की, कोणीही त्यावर मोहित व्हावे."[२] पण मर्ढेकरांच्या समग्र साहित्याबाबत एवढे करून थांबतील तर ते 'दभि' कसले?... त्यांनी त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांना, सहवासात आलेल्या अभ्यासकांना 'मर्ढेकरी वाङ्मयाभिमुख' केले आहे. मी स्वतः मर्ढेकरांच्या कवितेकडे पाठ फिरवूनच होते. कारण मर्ढेकर हे दुर्बोध व अवघड प्रकरण आहे, ते काही आपणास समजणार नाही ही माझी भीती अन् ठाम समजूत होती. पण ती पूर्णपणे गैर होती, हे 'दभि' सरांमुळे सिद्ध झाले. 'दभि' सरांना २००७ साली मी भेटले. शिवाय त्यानंतर फोनवरून त्यांनी मर्ढेकरांच्या वाङ्मयावर व्याख्यानही दिले. मर्ढेकरांची प्रत्येक कविता 'दभि' सर इतक्या अभ्यासपूर्ण आत्मविश्वासाने, प्रेमाने, तळमळीने बोलत होते की, मी भारावून गेले. त्या भारल्या स्थितीतच मर्ढेकरांची कविता वाचून काढली. पुन्हा वाचली आणि चक्क मर्ढेकरांच्या 'पिपात मेले .....' या कवितेवर लेख लिहिला. त्याच लेखात मी, — या कवितेतील 'उंदीर' ही प्रतिमा युद्धातील सैनिकांसाठी आहे.– या 'दभि' सरांच्या मताचे खंडनही केले. 'दभि' सरांनी तो लेख वाचला. मला वाटले, 'दभि' सर रागावतील; पण प्रत्यक्षात उलटच अनुभव आला. त्या लेखाबद्दल त्यांनीच स्वतःहून मला फोन केला. "समीक्षकाने स्वतःला जे वाटते, आकळते, ते निर्भयपणे लिहावे; तरच समीक्षा चांगली व दर्जेदार होते." असे म्हणून मला उमेद-उभारी दिली. त्याचे मोल करणे माझ्यासाठी अशक्य आहे. माझ्यासारख्या अनेकांना त्यांनी 'मर्ढेकरी काव्याभिमुख' केले आहे, हेही त्यांचे साहित्यिक कार्य अविस्मरणीय आहे. मर्ढेकरांचीच नव्हे, तर 'दभि' सरांसमोर आलेली प्रत्येक कविता त्यांच्याशी थेट संवाद साधायची. कथा, कविता, कादंबरी, नाटक, चरित्र, आत्मचरित्र, समीक्षा असा कोणताही वाङ्मयप्रकार असो; ती साहित्यकृती त्यांच्याशी संवाद करीत असल्याप्रमाणे 'दभि' सर त्या साहित्यकृतीबद्दल बोलायचे. बालकवींची 'फुलराणी' त्यांच्याशी अशीच 'मनातले गुज' बोलली. त्या कवितेतील तत्कालीन 'जरठ-बालविवाह' स असलेला निःशब्द विरोध आणि 'प्रेमविवाहाचा पुरस्कार' तसेच 'पतीनिवडी मध्ये स्त्रीच्या इच्छेचा अधिकार, पसंतीचा विचार' हा व्यंग्यार्थ 'दभि' सरांनी उकलून सांगितला. कवी 'बी' यांच्या चाफा या कवितेबद्दल बोलताना ते म्हणाले होते, "बी चिद्‌विलासवादी होते. ज्यांच्यावर ज्ञानेश्वरांच्या चिद्‌विलासाची छाप होती असा हा एकमेव कवी. त्यांच्या 'चाफा' कवितेत एकजण अबोल आहे. मुक्ताबाईंच्या 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' मध्येही एकजण अबोल आहे." असे अगणित संदर्भ 'दभि' उलगडून सांगायचे.

शरच्चंद्र मुक्तिबोध हे 'दभि' सरांचे आणखी एक आवडते कवी. मुक्तिबोधांबद्दल ते म्हणाले होते, "मुक्तिबोधांची काव्यप्रतिभा आणि कविता अस्सल आहे. पण मार्क्सवादी विचारांच्या प्रभावामुळे त्यांच्या अस्सल कवितेची थोडी उपेक्षा झाली. मुक्तिबोधांना भारतीय साहित्यशास्त्राबद्दल आदर होता; पण त्यामुळे मार्क्सवादी समीक्षेने त्यांना आपलेसे केले नाही अन् भारतीय साहित्यशास्त्रीय समीक्षेने त्यांना स्वीकारले नाही, असे मुक्तिबोधांच्या बाबतीतले माझे निरीक्षण आहे. त्यांचा 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' हा ग्रंथ उत्तम आहे. त्यात मर्ढेकरांच्या समीक्षाविचाराचे त्यांनी खंडन केले आहे." हे सर्व बोलताना मुक्तिबोधांच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाबद्दलचा 'दभिं' चा स्नेहादर व्यक्त होत असे. आपल्या एका ग्रंथात 'दभिं' लिहितात, "काळाचे आव्हान स्वीकारून, त्याला अनुरूप अशी नवचैतन्यपूर्ण

कलाविषयक भूमिका पत्करून १९४५ च्या आसपास ज्यांनी साहित्यलेखल केले, त्यांत 'मुक्तिबोध' हे नाव महत्त्वपूर्ण होय. टोपणनाव वाटावे इतके ते अनोखे आणि हवेहवेसे आहे; त्यांचे काव्यही तितकेच....अनोखे आणि हवेहवेसे आहे.... या सर्वच कवितांमध्ये एक विलक्षण उत्कटता, आविष्काराची अपरिहार्यता आहे. ... मुक्तिबोधांची कविता वाचताना एका वेगळ्याच सृष्टीत गेल्यासारखे वाटते. त्याचे एक कारण ही वेगळी, वन्य प्रतिमासृष्टी होय.... बाह्य संघर्षचित्रणांच्या भरीस कवी पडला असता तर सहजच त्याचे काव्य प्रचारकी, निदान वर्णनपर वस्तुनिष्ठ झाले असते.... परंतु आत्मसंघर्षानुभूतीमुळे मुक्तिबोधांचे काव्य भावकाव्य आणि विलक्षण अंतर्मुख भावकाव्य झाले. त्याला एखाद्या अनावर स्वगताचे रूप लाभले."[३] 'दभि' सरांचा हिंदी साहित्याचा अभ्यासही सखोल होता. हिंदी कविता, नाटके यांवरही ते अधिकाराने बोलत. आपल्या 'अटलजी' या लेखात ते म्हणतात, "राजकवी भा. रा. तांबे यांचे मराठी काव्य आणि कवी अटलबिहारी वाजपेयी यांचे हिंदी काव्य यांत रूपगुणदृष्ट्या विलक्षण साम्य आहे. गीतरचना, सामाजिक-राजकीय परिस्थितीचे भान, भारतीय जीवनदृष्टीवर निष्ठा, सांस्कृतिक प्रतिमासृष्टी आणि जीवनसंलग्न भाषाशैली. हा एक स्वतंत्र संशोधनाचाच विषय होईल.

"माजी पंतप्रधान विश्वनाथ प्रतापसिंग हेही एक चिंतनशील भावकवी आहेत; परंतु उत्कट आशयापेक्षा त्यांच्यातील चित्रकाराला कल्पकतापूर्ण प्रतिमांचे अधिक आकर्षण असावे;.....

"समाजवादी नेते नानासाहेब गोरे यांनीही भावमधुर चिंतनशील, काव्यात्म गद्य लिहिले आहे. ते वाचत असताना नेहमी बॉन्साय वनस्पतीचे स्मरण होते. भव्य आशयाला त्यांनी लघुरूप दिले आहे, असे वाटत राहते आणि मग मनाला प्रश्न पडतो–राजकीय धकाधकीमुळे यांचे साहित्य प्रभावी झाले की त्यामुळेच त्यांच्या साहित्याला मर्यादा पडल्या?"[४] 'दभिं' चे हे चिंतन वाचकाला, अभ्यासकांना लिहिते करणारे आहे.

पु. शि. रेग्यांची कविता 'दभि' सरांना खूप मोलाची वाटे. पु. शि. रेग्यांबद्दल 'दभि' म्हणतात. "जीवनाचा महत्तम गौरव करीत असतानाच कलावादाची अनन्यभावे पूजा करणारा निःसीम कलावंत म्हणून मर्ढेकरोत्तर काळात पु. शि. रेगे यांचे स्थान अद्वितीय आहे."[५] पु. शि. रेग्यांच्या 'सावित्री' कादंबरीने त्यांना भारून टाकले होते. 'सावित्री' कादंबरीची चर्चा निघाली की, ते हिरव्याकंच डोंगरावरून वाहणा-या दुग्धधवल देखण्या धबधब्याप्रमाणे बोलू लागत. 'सावित्री' कादंबरीही त्यांना मुखोद्गत होती. कोणते वाक्य किती क्रमांकाच्या पत्रात आहे, ते 'दभि' अचूक सांगत. 'सावित्री' कादंबरीचा प्रभाव काही लेखक-लेखिकांवर जरूर आहे. उदा., गौरी देशपांडे. 'दभि' लिहितात, "कारागृहातून पत्रे या कथेवर पु. शि. रेगे यांच्या 'सावित्री' या कादंबरीची दाट छाया आहे; पण उभय नायिकांचे निष्कर्ष किती विरुद्ध : सावित्री नाती जोडत जाते व मीपणातून मुक्त होते; 'कारागृहा' तील नायिका नाती तोडत जाते व मीपणातून कैद होते! सावित्री खरीखुरी कूर्गी (ग्रीक) आहे. कालिंदी ग्रीक पुरुषाच्या आसक्तीने आंधळी झाली आहे."[६] 'दभिं'ची ही आणि अशी समीक्षा वाचली की, त्यांच्या कलाकृतीच्या अंतरंगाचा नेमका ठाव घेणा-या आणि सौंदर्यरहस्याच्या तळाशी जाणा-या आकलनशक्तीचा, सौंदर्यदृष्टीच्या चोखंदळपणाचा प्रत्यय येतो. 'सावित्री' कादंबरीचे वाचन 'दभि' सरांनी नागपूर व पुणे येथे अनेकदा केले होते. प्रकट वाचनाचा तो एक आदर्श वस्तुपाठ होता.

केवळ 'दभि' सरांचे 'सावित्री' कादंबरीचे वाचन ऐकण्यासाठी त्यांचा शिष्यवर्ग व चाहते दूरच्या अंतरावरून प्रवास करून येत असत. 'सावित्री' या छोटेखानी कादंबरीतील प्रतिमांचा व्यंग्यार्थ व बव्हर्थ ते आपल्या समीक्षेतून उलगडून सांगत. 'सावित्री' कादंबरीतील 'युद्धाची पार्श्वभूमी' ही त्या कादंबरीतील अव्यक्त व्यक्तिरेखा आहे, असे ते म्हणत. 'दभि' सरांना समग्र 'रेगेय वाङ्मय' भावले होते. त्यांनी 'बिंदो' या रेग्यांच्या कथेचा सांगितलेला अन्वयार्थ व व्यंग्यार्थ वाचल्यावर मी थक्क झाले होते. एका वाक्यात एखाद्या कलाकृतीचे मूल्यमापन करतानाही त्यांच्यातील व्यासंगी, साहित्यप्रेमी, ज्येष्ठ व श्रेष्ठ समीक्षकाचा साक्षात्कार होत राही. एखाद्या समीक्षकाच्या मताचे खंडन करावयाचे असेल तर, ते त्याच्या मताचे सप्रमाण खंडन करीत; पण त्यात मनोमालिन्य कधीच

नसे. समीक्षक हा सम + अक्ष असला पाहिजे, असे ते म्हणत. भालचंद्र नेमाडे पु. शि. रेग्यांच्या कादंब-यांवर टीका करतात पण रेग्यांच्या कवितेची प्रशंसा करतात; यामागे त्यांची एक व्यूहात्मक भूमिका आहे. पण पु.शि. रेग्यांचे समग्र साहित्य हे 'भाषिक पातळीवरील एक वस्तुनिष्ठ सौंदर्यात्म संघटना आहे,' असे सांगून 'दभि' रेग्यांचा गौरव करतात.

'सावित्री' प्रमाणेच 'रणांगण' कादंबरीनेही 'दभि' सरांना अक्षरशः झपाटून टाकले होते. 'रसरशीत प्रतिमा हे बेडेकरांच्या कादंबरीचे बलस्थान आहे. विश्राम बेडेकर .... कादंबरीतून प्रसरणशील प्रतिमा वापरतात', असे सांगून त्यांनी 'रणांगण' कादंबरीतील 'कपड्याच्या कपाटा'-ची (वॉर्ड रोब) प्रतिमा मला उलगडून सांगितली होती. 'विश्वसाहित्यात विराजमान होण्याइतका रणांगण या कादंबरीचा दर्जा श्रेष्ठतम आहे', असे ते म्हणत. या कादंबरीवर 'दभि' सरांनी पाच लेख लिहिले–

१. तिस-यांदा रणांगण (१९७१), २. विश्राम बेडेकरांचे साहित्य (१९७२), ३. पहिल्यांदा रणांगण (१९९३), ४. आणखी एकदा रणांगण (२००८), ५. 'रणांगण'चा परागंध (२००९). 'रणांगण'चा परागंध या समीक्षालेखात त्यांनी 'सावित्री' आणि 'रणांगण' या दोन कादंब-यांतील साम्य व फरक अत्यंत तर्कशुद्ध पण लालित्यपूर्ण समीक्षेने सांगितला आहे. दोन्ही कादंब-यांतील गाभाभूत सौंदर्य उकलून दाखविले आहे. दोन्ही कादंब-यांतील तपशिलांचे साम्य व फरक आणि गाभ्यांतील साम्य व फरक विचक्षण समीक्षेतून मांडले आहेत.

जी. ए. कुलकर्णी हाही 'दभि' सरांचा अगत्याचा विषय होता. जी.एं.मधील अस्सल कथाकाराचे नेमके सामर्थ्य आणि मर्यादा त्यांनी जाणल्या होत्या. जी.एं. सारख्या स्तुतिप्रिय लेखकाला 'दभि'सरांनी त्यांच्या कथावाङ्मयातील केलेले दोषदिग्दर्शन खटकणे साहजिकच होते. एके ठिकाणी 'दभिं' सर जी. ए. च्या कथेविषयी, 'त्या फार तर्ककर्कश आहेत' असे म्हणाले होते. त्यावर जी. ए. लिहितात, "त्या फार तर्ककर्कश आहेत' असे 'दभि' नी म्हटले, तेव्हा मला ते शब्द भोळसट वाटले. त्या कथा तर्कपद्धतीच्याच आहेत. भूमितीच्या पुस्तकात सारेकाही रेषाकर्कश आहे असे म्हटल्याप्रमाणे ते आहे"[७] असे असले तरी 'दभि' सर आपल्या समीक्षेमध्ये लिहितात, "जी. ए. कुलकर्णी असाधारण प्रतिभेचा कथाकार होता. त्यांच्या कथासृष्टीची तुलना दुस-या कुठल्याच मराठी कथाकाराच्या कथासृष्टीशी होऊ शकत नाही....जी.एं.जवळ अचाट प्रतिभा होती." [८] 'दभि' आणि त्यांच्या समीक्षेवर कुणी प्रतिकूलता नोंदविली, तरीही 'दभि' सर त्याचा परिणाम आपल्या समीक्षेवर होऊ देत नसत. व्यक्तिद्वेषाने त्यांची समीक्षा कधीच डागाळली नाही. याची प्रतीती आल्यामुळेच की काय, एके ठिकाणी जी. ए. लिहितात."दभि हे टीकावाङ्मय योग्य त्या जबाबदारीने व गांभीर्याने लिहितात.....तेव्हा त्यांच्या लेखनाचे वाचनही आवर्जून जबाबदारीनेच झाले पाहिजे." [९]

ग्रेस म्हणजेच माणिक गोडघाटे हे 'दभि' सरांचे विद्यार्थी. स्वतः ग्रेस आपल्या एका मुलाखतीत म्हणतात, "खरे तर,.... त्या वेळी मी त्यांच्या व्यक्तित्वाने अंतर्बाह्य दिपून गेलो होतो. भारावून गेलो होतो. माझ्या आत्म्याला स्पर्शून जाणा-या कुठल्याही जीवनव्यवहारात माझी टोटल इन्व्हॉल्वमेंट असते. ... झपाटली लेक। झाली वेडीपिशी। वैद्य ना ज्योतिषी। कामा येई।– अशी माझी अवस्था. वाङ्मयाच्या अध्यापनाला जसा आवाज हवा, तसा त्यांच्याकडे आहे. त्यामुळे त्यांची वाणी जरी स्त्रैण वाटत असली, तरी इट हॅज वंडरफुल इफेक्ट्स. वाङ्मयीन संदर्भांची समृद्धता, कलाकृतीच्या सौंदर्यरहस्याच्या तळाशी जाण्याची दुर्मीळ आकलनशक्ती व वाङ्मयाचे अपर्यायी प्रेम हे त्यांचे मोलाचे विशेष. एक विद्यार्थी म्हणून दोन वर्षे मी प्रतिभेच्या पातळीवर शोषून घेत होतो. ....ॲकॅडमिक व वाङ्मयीन अशी दोन संतुलित परिमाणे त्यांच्या अध्यापनशैलीची वैशिष्ट्ये. कधीकधी या शैलीला निर्मितीचा स्पर्श होऊन जायचा. .... डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या या वाङ्मयीन व्यक्तित्वाला मी अक्षरशः मिरवीत हिंडलो आहे."[१०] एका शिष्याने आपल्या गुरूविषयी काढलेले हे प्रशंसोद्गार म्हणजे पोकळ स्तुती नसून ती वस्तुस्थिती होती. दुर्दैवाने त्या दोघांमध्ये मतभेद झाले. तरीही 'दभि' जेव्हाजेव्हा ग्रेसच्या कवितेबद्दल बोलत, तेव्हा ते ग्रेसच्या निवडक दर्जेदार कवितांचा गुणगौरव करीत. पण ग्रेसच्या मर्यादाही सोदाहरण दाखवून देत.

ग्रेसच्या कवितालेखनाच्या प्रारंभीच्या काळात 'दभिं'नी ग्रेसच्या कवितेचा खूपच उदोउदो केला. 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : एक पुनःस्थापना' या ग्रंथात तर 'दभिं' नी ग्रेसच्या काव्यगत दुर्बोधतेवर अगदी दीर्घ विवेचन केले आहे. पण काही काळानंतर व्यक्तिगत भेटीत चर्चेच्या वेळी मात्र ते ग्रेसच्या कवितेच्या ('ग्रेस' या व्यक्तीच्या नव्हे) उणिवा ठळकपणे दाखवू लागले. त्यांच्या या दुटप्पी समीक्षेबद्दल मी एकदा त्यांना स्पष्टच विचारले, "सर, प्रारंभी तुम्ही ग्रेस यांची खूप स्तुती करीत होता. 'दुसरी परंपरा'ची अर्पणपत्रिका तर ग्रेस यांच्या नावे आहे. आता मात्र त्यांच्या कवितेबद्दल प्रतिकूल कसे बोलता? त्यामुळे ग्रेसच्या कवितेविषयीची तुमची समीक्षा गोंधळात टाकू शकते." त्यावर 'दभि' सर म्हणाले, "समीक्षकाने व्यक्तिद्वेषाने समीक्षा लिहायची नसते, हे तत्त्व मी नेहमी पाळतो. अगदी प्रारंभी ग्रेसच्या कवितेत नवनिर्मितीचे स्फुल्लिंग होते. एका उद्‌योन्मुख कवीला उभारी, उमेद देण्यासाठी कौतुकाचे शब्द फार मोठे बळ देतात. ग्रेस प्रतिभावंत आहे, पण उत्तरोत्तर ग्रेसमधला कवी क्षीण होत गेला."

मर्ढेकर-रेगे-मुक्तिबोधांच्या कविता हा त्यांचा आवडीचा विषय असला, तरी 'म. म. देशपांडे', 'ना. घ. देशपांडे', 'बी' यांचीही कविता त्यांना आवडायची. मराठी काव्याची 'पहिली परंपरा', 'दुसरी परंपरा', 'तिसरी परंपरा' अशा साक्षेपी समीक्षेने त्यांनी मराठी काव्यसमीक्षेत मोलाचे योगदान दिले आहे.

'दभि' सरांची ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरीभक्ती हा एक स्वतंत्र विषय आहे. ते कधी ज्ञानेश्वरी पारायणाला बसले नाहीत; पण त्यांचे हृदय ज्ञानेश्वरांविषयीच्या श्रद्धेने आणि भक्तीने काठोकाठ भरले होते. त्यांच्याशी फोनवर बोलताना ते प्रत्येक वेळी ज्ञानेश्वरीतील एकतरी ओवी सांगायचेच. ज्ञानेश्वरांविषयी भान हरपून बोलताना ते भावविभोर व्हायचे. बोलणे आणि मन भावसंपृक्त झाले की, काहीवेळा ते सद्‌गदित व्हायचे आणि हुंदका आवरला नाही की, फोन ठेवून द्यायचे. हा अनुभव मला खूपदा आला आहे. ज्ञानेश्वरीतल्या ओव्या त्यांना केवळ मुखोद्‌गतच होत्या असे नाही तर, ती ओवी कोणत्या अध्यायातली आहे, हेही ते बिनचूक सांगत.

एक 'साहित्यरत्न' म्हणून त्यांना 'ज्ञानेश्वरी' या कलाकृतीचे मोल आणि अप्रूप होते. साहित्यप्रेमी, अभ्यासक आणि समीक्षक यांबरोबरच ज्ञानेश्वरांबद्दलचा अपूर्व कृतज्ञताभाव त्यांच्या मनी सतत वास करून होता. त्यांच्या व्यासंगातून, अध्यापनातून, संवादातून, व्याख्यानातून व समीक्षेतून तो व्यक्त होत असे. आपल्या एका प्रास्ताविकात ते लिहितात, "एक अनुभव सांगतो. अध्याय शिकविताना स्वाभाविकच उपक्रमोपसंहारावर जोर दिला जाई आणि प्रत्येक वेळी प्रश्न पडे,...आणि एक दिवस शिकविताशिकविता सगळे अंग शहारून उठले. एकदम जाणवले की, ही ज्ञानेश्वरीतील प्रतिपादनाची प्रात्यक्षिके आहेत! तो एक वैचारिक आध्यात्मिक साक्षात्कार होता. ज्ञानेश्वरीवाचनाचे त्या क्षणी सार्थक झाले होते. ज्ञानेश्वरीतील युग्मे ही शिवशक्तीची निदर्शक आहेत, ही प्रतीतीदेखील अशीच साक्षात्कारसदृश ठरली."[११] पुढे ते लिहितात, "....पण अशीही एखादी घटना असू शकते का की, जी आपला गतकाळ बदलून टाकेल? पूर्वी कोणी मला विचारले असते तर त्याला मी वेड्यात काढले असते. हे कसे शक्य आहे? जे घडले ते कसे बदलणार? पण 'श्रोतृसंवादा'तून ज्ञानेश्वरीचे आणि ज्ञानेश्वरांचे जे रहस्य मला साक्षात झाले, त्याने माझा गतकाळच बदलून गेला......ज्ञानेश्वरीतील प्रात्यक्षिके, ज्ञानेश्वरीतील शिवशक्तिरूपे जाणवली. आणि सगळा भूतकाळ अगदी एकसंध, उपकारक आणि अर्थपूर्ण होऊन गेला.... ज्ञानेश्वरीने माझा गतकाळ असा अर्थपूर्ण, प्रयोजनपूर्ण केला. ज्ञानेश्वरीला आणि ज्ञानेश्वरीविषयक लेखनाला माझ्या आयुष्यात एवढे स्थान आहे."[१२] साहित्यकृती ही जिवंत कलाकृती असते, या 'दभि'-सरांच्या शब्दांचा हा इतका बिनतोड दाखला आणि प्रमाण खरोखरच आश्चर्यचकित करणारे आहे. निवृत्तिनाथ आणि ज्ञानेश्वर या असामान्य गुरुशिष्यांचे अद्वैत सांगतानाही दभि अत्यंत अपूर्व अप्रूपाने लिहितात. त्यासाठी त्यांचा 'ज्ञानेश्वरीतील निवृत्तिनाथांचे उद्‌गार' हा लेख मूळातून वाचायला हवा. 'दभि' सरांनी 'ज्ञानेश्वरांचे पसायदान' या लेखाच्या शेवटी जे मनोगत व्यक्त केले आहे, त्यातून त्यांची सामाजिक, धार्मिक आणि राष्ट्रीय निरीक्षणातील सूक्ष्मता दिसते. त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरांच्या विश्वविकासाच्या

चिरंतन तत्त्वाचे संपूर्ण प्रगाढ आकलनही दिसते. 'ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद : निष्कर्ष' या लेखात 'दभि' सरांनी मांडलेल्या निष्कर्षात अभ्यासातून आलेला कोरडेपणा नाही; तर त्यात ज्ञानेश्वरांच्या प्रति असलेली अढळ श्रद्धा, साहित्यातील अपूर्व कलाकृती असलेल्या ज्ञानेश्वरी या ग्रंथाविषयी नितांत प्रेम आणि स्वव्यासंगाबद्दलचा आत्मविश्वास आहे. त्याचबरोबर त्यात लालित्य असल्याने या समीक्षालेखनाला सपुष्प वेलीचे सौंदर्य प्राप्त झाले आहे. समीक्षेबद्दलचे मौलिक विचार मांडताना 'दभि' सर म्हणतात, "…..साहित्य हा समीक्षकाचा ध्यास असतो….एक अस्वस्थता आहे. …..साहित्यकृतीकडे धावत असतात…..ही अस्वस्थता त्यांना समीक्षालेखनास प्रवृत्त करते. समीक्षकांचा एक स्तर मात्र असा असतो, जो समीक्षेला कलाकृतीचे स्वरूप देत नाही, तर आस्वाद्य साहित्यकृतीला आपल्या समीक्षेने नवनवे जन्म देत असतो; नवनवे मृत्यूही. अशा समीक्षकाला 'सर्जनशील समीक्षक' म्हणतात…..ती प्रतिभानिर्मिती असते." [१३] समीक्षेचे स्वरूप आणि अस्सल समीक्षकाची लक्षणे 'दभिं'सारखा प्रातिभसमीक्षकच सांगू शकतो.

'दभि' सरांचे साहित्यप्रेम अपर्यायी आणि तडजोडशून्य होते. त्यांचे 'शब्द' या द्रव्यावर उदंड प्रेम होते. 'शब्द' या शक्तीची ऊर्जा तळागाळापर्यंत पोचत नाही याचे त्यांना वाईट वाटे. ते म्हणतात, "आज साहित्याचा शब्द समाजापर्यंत पोचतोच कुठे?….अशा स्थितीत मानसगोचर शब्दांचे महत्त्व समाजाला पटणे फार अगत्याचे आहे." [१४] भाषेवरचे त्यांचे प्रेम दाखवेखोरीचे किंवा बोलघेवडे नव्हते; तर साहित्य, समीक्षा, व्याकरण, छंदशास्त्र, अलंकार, काव्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र असे त्यांचे भाषाप्रभुत्व बहुआयामी होते. पण त्याला अहंकाराचा स्पर्श नव्हता. बोलताना ते विषयानुरूप या सगळ्या विषयांवर सांगायचे. श्रोत्याने अभ्यासू व्हावे, जाणकार वाचक व्हावे, लिहिते व्हावे, लिहिणा-याने लेखक व्हावे, समीक्षक व्हावे, व्यासंगी व्हावे, ही त्यांची तळमळ असे. विषय कोणताही असो, त्यावर त्यांची हुकमत असे. विषय प्रासादिक करून मांडताना ते अनेक उदाहरणे, दृष्टांत देत. त्याचबरोबर अनेक संदर्भ देत. विषय सुस्पष्ट व सुगम करताना ते संदर्भांची जी पखरण करीत, त्यातून श्रोत्यास त्या विषयाची गोडी लागे. त्यावर काहीतरी लिहावेसे वाटे. श्रोता एक असो वा हजारो; 'दभि' सर साहित्यावर तितक्याच ममत्वाने, व्यासंगाने बोलायचे. हजारो संदर्भ आणि संदर्भग्रंथांची नावे सांगायचे. मराठीतील कवी, लेखक, समीक्षकांची लेखनवृत्ती-प्रवृत्ती, त्यांची लेखनप्रक्रिया, आकलनशक्ती, त्यांच्यातील सुप्त गुण व मर्यादा त्यांना वेगाने उमगत असत. अनेकांना 'दभि' सरांनी लिहिते केले आहे. पीएच. डी. च्या प्रबंधातून बंदिस्त झालेले संशोधन व समीक्षा प्रकाशात आणण्याचा त्यांचा आग्रह असे. त्यांच्या दृष्टीने ज्ञानसंक्रमण होणे ही बाब खूप महत्त्वाची होती. फोनवरून त्यांना कोणताही प्रश्न विचारला की, 'हे पाहा' असे म्हणून विवेचनाला सुरुवात करायचे. त्यांचा तो मुद्दा पूर्ण उलगडून विवेचन पूर्ण झाल्याशिवाय ते थांबत नसत. त्या विवेचनात त्यांचा श्रवणीय आवाज, त्यातील आरोह-अवरोह, पॉजेस, मध्येच केलेली मिश्किली, संदर्भांची समृद्धता, प्रदीर्घ व्यासंग सगळेसगळे प्रत्ययाला येई. त्यांचे ते बोलणे सुरेख रागदारीप्रमाणे वाटे. मी त्यांना तसे बोलून दाखविल्यावर ते म्हणाले, "संगीतात जसे कालानुरूप, प्रकृतिनुरूप राग असतात, त्याचप्रमाणे वक्तृत्वाचेही राग केले पाहिजेत. त्याचे थाट केले पाहिजेत. वेळेला आणि प्रसंगाला अनुरूप असे वक्तृत्वाचे राग निश्चित केले पाहिजेत. औचित्य साधावे हे महत्त्वाचे." गुरू-शिष्य संवादाबद्दल ते म्हणत, "शिष्य गुरूला अधिकाधिक समृद्ध करीत असतो. शिष्याने गुरूला प्रश्न विचारला की, गुरूचे पूर्वज्ञान जागृत होते. त्या ज्ञानात अधिक अनुभवांतून आलेल्या ज्ञानाची भर घालून गुरू ते ज्ञान उत्तराच्या रूपाने शिष्याला देतो. म्हणजे प्रश्नाच्या रूपाने शिष्य गुरूला उत्तेजना देत असतो. गुरूचे ज्ञान + शिष्याने प्रश्न + त्या प्रश्नाचे उत्तर + त्या शिष्याचा त्यानुषंगाने केलेला अभ्यास व चिंतन यांच्या संगमाने ज्ञानाचा प्रवाह वाहतो, वाढतो. गुरूपेक्षा शिष्य मोठा होतो." असे हे 'दभि' सर एकदा म्हणाले, "हर हँसी चीज का मैं तलबगार हूँ। बाजारसे गुजरा हूँ। खरीददार नहीं हूँ।।" सौंदर्य हे विकत घेता येत नाही. 'सौंदर्य' आणि लावण्य हे समानार्थी शब्द नाहीत; म्हणून तर संत समर्थ रामदास श्रीशंकराच्या आरतीमध्ये म्हणतात, "– लावण्यसुंदर

मस्तकी बाला।" याचे कारण या दोन्ही शब्दांची प्रतवारी वेगळी वेगळी आहे. त्याचा अर्थ चक्रधरस्वामींनी सांगितला आहे की, "अवयवांचे बरवेपण ते सौंदर्य : तयावेगळे उधासुनि येई ते लावण्य." अशा या शब्दांच्या अर्थच्छटा, आयाम–आकार समजून घेतले पाहिजेत. आणि हे पाहा, साहित्यशास्त्रीय दृष्टी समृद्ध होण्यासाठी आणि वाङ्मयीन संकल्पना स्पष्ट होण्यासाठी माझे गुरू ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'भारतीय साहित्यशास्त्र' हा ग्रंथ तू शंभर वेळा आणि मर्ढेकरांचे 'वाङ्मयीन महात्मता' पन्नास वेळा वाच; म्हणजे तुझ्याकडे समीक्षालेखनाचे सामर्थ्य येईल. माझ्यावर आनंदवर्धन, अभिनवगुप्त आदींचे ऋण आहे. मला अजूनही खूप- खूप वाचायचे आहे, लिहायचे आहे. त्यासाठी हा एक जन्म पुरेसा नाही. त्यासाठी ईश्वराने मला अनेक जन्म द्यावेत. प्रत्येक जन्मात मी साहित्य वाचावे, आस्वादावे समीक्षा लिहावी. साहित्यसेवा करावी." असे हे 'दभि'- सरांचे समृद्ध बोलणे कधी संपू नये, असे वाटायचे.

माझ्यासारख्या अनेकजणांसाठी 'दभि' सर हे मराठी साहित्याची 'चालतीबोलती इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी' होती. त्यांच्यातील प्रामाणिक साहित्यप्रेमी आणि विचक्षण समीक्षक त्यांच्या शेवटच्या श्वासापर्यंत जागृत होता. अगदी अलीकडे त्यांनी नेमाड्यांच्या कादंब-यांवर लेख लिहिला होता. त्यावर त्यांना नेमाड्यांचे पत्र आले होते; ते पत्र त्यांनी मला फोनवर वाचून दाखविले होते. 'दभि' सर दूर पुण्यात डी. एस के विश्व मध्ये राहायचे. त्या दूर अंतरावर दूरध्वनीने मात करून त्यांच्याशी खूपखूप बोलणे व्हायचे. यावरूनच मी एकदा त्यांना विचारले, सर ज्या दूरध्वनीमुळे आणि दूरध्वनीवर सुसंवादाचे सूर जुळून झंकारतात त्याला 'दूर'ध्वनी का म्हणतात? त्याला 'सुर'ध्वनी म्हणावयास हवे. त्यावर 'वा सुंदर!' अशी त्यांनी दाद दिली. आता हा 'सूरध्वनी' आणि त्यावरील साहित्य-संवाद बंद पडला आहे.

'दभि' सरांची वाणी अत्यंत ऋजू आणि शुद्ध होती, तर लेखणी साक्षेपी-समर्थ होती. त्यांच्या वाणी–लेखणीच्या संपर्कात आलेली व्यक्ती त्यांचीच होऊन जाई. त्यांची संवेदनशीलता इतकी तीव्र आणि प्रभावी होती की, त्यांच्या सहवासात आलेली व्यक्तीही संवेदनशील बनून साहित्याकडेच नव्हे तर जीवनाकडेही पाहू लागे. नित्याच्या लहानमोठ्या प्रसंगघटितांतून न दिसलेले सौंदर्य आणि अर्थ शोधण्याचा डोळसपणा त्या व्यक्तीला प्राप्त होई. आपल्या समोरच्या व्यक्तीची आकलनशक्ती व ग्रहणक्षमता वाढावी हे त्यांच्या बोलण्याचे, संवादाचे, व्याख्यानाचे उद्दिष्ट असे; आणि ते निश्चितपणे सफल होत असे. त्यांच्याकडे येणा-या प्रत्येकाला ते मधुर, श्रवणीय वाणीने तृप्त करीत. त्यांच्या या सतत ज्ञानदान आणि साहित्यसंवाद करण्याच्या अथक वृत्तीबद्दल मला आश्चर्य वाटायचे; तेव्हा ते म्हणाले होते, "हे पाहा, साठवलेल्या पाण्याला संपण्याची भीती असते. मी झरा आहे–जिवंत झरा आहे. त्याला आटण्याची भीती नाही." खरंच 'दभि' सर म्हणजे अगणित व्यक्ती, विद्यार्थी–विद्यार्थिनी, अभ्यासू व अभ्यासक अशा माणसांच्या बेटाबेटांतून वाहणारा झरा होते. हा 'निळा सावळा झरा' आता लुप्त झाला आहे.

**संदर्भ** :


१. कुलकर्णी द. भि. – प्रतीतिभेद. आकांक्षा प्रकाशन, नागपूर. प्रथमावृत्ती २००७, पृ. १२८

२. कुलकर्णी द. भि. – समीक्षेची चित्रलिपी, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती २०११, पृ. ४५

३. कुलकर्णी द. भि. – पहिली परंपरा, अमेय प्रकाशन, नागपूर. प्रथमावृत्ती १९७६, पृ. ४९, ५१, ५८

४. कुलकर्णी द. भि. – प्रतीतिभेद, आकांक्षा प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती २००७, पृ. १३९

५. कुलकर्णी द. भि. – समीक्षेची चित्रलिपी, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती २०११, पृ. २१

६. कुलकर्णी द. भि. – प्रतीतिभेद, आकांक्षा प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती २०११, पृ. ३७

७. कुलकर्णी जी. ए. – जी. एं. ची निवडक पत्रे, खंड : २, मौज प्रकाशन. प्रथमावृत्ती १९९८, पृ. १४२

८. कुलकर्णी द. भि. – प्रतीतिभेद, आकांक्षा प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, २०११, पृ. ५०

९. कुलकर्णी जी. एं. – जी. एं. ची निवडक पत्रे, खंड : २, मौज प्रकाशन, प्रथमावृत्ती १९९८, पृ. २६१

१० ग्रेस – ग्रेस : एक मुलाखत, ग्रंथमाला खंड एक, अंश एक. पृष्ठ. ९२

११ कुलकर्णी द. भि. – प्रतीतिविश्रांती, प्रास्ताविक,

विजय प्रकाशन, नागपूर. प्रथमावृत्ती १९९२, पृ. पाच

१२. कुलकर्णी द. भि. - तत्रैव. पृष्ठ. १४

१३. कुलकर्णी द. भि. - प्रतीतिभेद, आकांक्षा प्रकाशन, नागपूर. प्रथमावृत्ती २०११, पृ. ७, ८

१४. कुलकर्णी द. भि. - तत्रैव, पृष्ठ १३२

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक २

श्री. के. वनपाल

सतराव्या वर्षी मला शेती करण्यात कशा अडचणी असतात, याचा दाहक अनुभव आला; तो सांगितलाच आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा दिल्यानंतर महसूल खात्यात अधिकारी झालो आणि शेतीशी पुनः संबंध आला. शेती हा व्यवसाय किती कष्टाचा व दुःख सोसण्याचा आहे, याचे अनुभव मी बारंवार घेतले. शेतक-यांसाठी काही ठोस केले पाहिजे, याची जाणीव तीव्र होत गेली. जे अनुभव मला आले, त्यांतलेच काही इथे देतो.

(१)

शिवामास्तर हे माध्यमिक शिक्षक होते. कामात अगदी दक्ष. रोज मोटरसायकवरून वेळेवर शाळेत जाणार. इमानेइतबारे मुलांना शिकवणार. गावातल्या सर्व सार्वजनिक कामांत त्यांचा पुढाकार असे. हातात माइक घेऊन पाहुण्यांची ओळख करून देणं, प्रास्तविक भाषण करणं, आभार मानणं ही सगळी कामं अगदी मनापासून करीत.

त्यांचे वडील एके काळी सरपंच होते. म्हणून आपणही केव्हातरी सरपंच व्हायचंच, अशी जिद्द ते बाळगून होते. बोलण्यात मात्र, "छे, छे! सरपंच व्हायची आपली काही इच्छा नाही," हे पालुपद तोंडात घोळत असे. त्यामुळे गावच्या राजकारणातली टगेमंडळी मास्तरांच्या बाबतीत निश्चिंत होती!

मास्तरांची थोडी शेती होती. परड्यात जनावरं होती. पदरी दोन मुलगे होते; पण आता मोठे होऊन नोकरीला लागले होते. मोठा मिलिटरीत होता व धाकट्याला ब-याच खटपटीलटपटी करून ग्रामसेवक म्हणून नोकरी मिळवून दिली होती. आता हाताशी कोणीच नव्हते. त्यामुळे शेतीचं कसं व्हायचं, याची चिंता होती.

थोडा पैसा हाती आला तशी एक आडगि-हाइकी करून एक-दोन एकर शेती वाढवली. आता ती पाह्यला पोरं हाताशी नाहीत आणि खायला वेळ नाही, याचा खूप विचार करून त्यांनी एक सालकरी पकडला. पैशांचा विचार करायचा नाही, सालक-याला हवं ते द्यायचं; पण शेती चांगली करायची, हा मास्तरांचा विचार.

हळूहळू सालकरी रुळू लागला. आता त्याच्या कलानं घ्यायचं म्हणजे त्याला विचारून सगळं करायचं! म्हणून सालक-याला परड्यात एक खोली बांधून देऊ; आपल्याला जशी शौचालयाची गरज, तशी त्यालाही गरज असणार म्हणून ही खोली जवळ बांधून दिली. परड्यात एक म्हैस, एक बैल, दोन-चार शेळ्या असा बारदाना. असे चार-पाच महिने गेले, "आणखी एक बैल घेऊ. गोठा जरा मोठा करू. चार रवणाचं शेड वाढवू, म्हणजे दुस-या कुणाचा पैरा करायला नको." पैरा म्हणजे ज्याचा बैल वेळप्रसंगी राबणुकीला वापरला, त्याला त्याच्या गरजेच्या वेळी आपलाही देऊ करायचा.

"मग याला किती पैसे लागतील?" शिवामास्तर म्हणाला.

"लय नाही; पण जमल जमल तसं एक एक करू; पण अगोदर बैल घेऊ." – सालकरी

रविवारी वेळ काढून खिलारी बैल मिळवण्यासाठी दोघे पंढरपुराकडे रवाना. सरळ शिंगांचं पांढरंशुभ्र जनावर त्यांना पसंत पडलं. मागचापुढचा काही विचार न करता, रोख पैसे देऊन पंढरपूरला एक ट्रक गाठून बैल घेऊन दोघे गावी हजर. आसपासच्या नातेवाइकांना धक्का! 'हे काय आकरित?'

बैल रुळताना जरा खोडीलच निघाला. मालकांवर आणि सालक-यांवरच शिंगं उगारू लागला. सालक-यांचा सल्ला, "जरा एक–दोन महिने जाऊद्यात, रुळंल आपोआप."

"अरे, पंढरपुरासनं इथे येईपर्यंत बरा होता की!" -मास्तर

"आवं इथवर येईपर्यंत त्याचा मालक नव्हता का आपल्या बरोबर त्याला बी हा भाग बघायचा होता म्हणून

अनुक्रमणिका

नव्हता का आला आपल्याबरोबर?" –सालकरी

मास्तर चूप! आता देखणा बैल कामाला कधी यायचा? सालक-यांनं मुद्दा काढला, "आता असं करू, जरा गोठा चार खणानं वाढवू. म्हणजे स्वतंत्र जागा हुईल आणि मग रुळंल हे नवं जनावर."

"असं म्हणता? मग बघा किती पत्रे लागतात, मेढी किती लागतात? गोठा जरा व्यवस्थित बांधू म्हणजे शेणखत, जनावराच मूत सगळं एकत्र व्यवस्थित उकिरड्यात जाईल. किंवा असं करू, जमलं तर गांडूळ खताचा खड्डा बी करू, म्हणजे तेही शेताला उपयोगी." मास्तर म्हणाले. मास्तरांना आता 'शेतीनिष्ठ पुरस्कारा'चे डोहाळे लागलेले!

"हे बेस झालं बघा. मी उद्याच तुम्हाला काय काय लागतं त्याची लिस्ट देतो, अन् गुरुवारच्या बाजारादिवशी हे सगळंच घेऊ. बाजारात स्वस्त्यात बसंल!" -
- सालकरी

गुरुवारी मास्तरांनी सुट्टी काढली. दोघेही अंदाज घ्यायला सकाळीच बाजारात गेले. अंदाज ७५,०००/- रुपयांचा निघाला. दुस-या गुरुवारपर्यंत काही घरचे, काही उसने, काही मुलांचे असे पैसे जमवून मास्तर आणि सालकरी बाजारात. सामान घेतलं, दोन बैलगाड्या भाड्याच्या करून सगळं सामान घेऊन दोघही सांजेच्या पारी गावी हजर. दुस-या दिवशी मजूर, सुतार, गवंडी, यांची जुळवाजुळव सुरू झाली. एक-दोन दिवसांत गोठा बांधायला सुरुवात. मास्तर शाळेतून घरी यायच्या ऐवजी थेट बांधकामावर जायचे. 'कुठवर आलं?'

मास्तर दर शनिवारी मजूर, सुतार, गवंडी यांचा पगार करायचे. वास्तविक मास्तरांना रविवारी सुट्टी, पण त्या दिवशी बांधकामावरच्या मंडळींनाही सुट्टी!

बांधकाम पूर्ण होईस्तवर मास्तरांना चांगला सव्वा लाख रुपयांचा खर्च झाला. आता शेतीची कामं झपाट्यात आणि स्वतंत्रपणे होतील, या भ्रमात मास्तर खूष!

काही दिवस गेले. एका घरगुती कार्यक्रमासाठी त्यांचा अतीतचा पाहुणा घरी आला. मास्तरांनी त्याला रात्री ठेवून घेतला. हेतू हा की, सकाळी आपण पाहुण्याला नवीन घेतलेला बैल आणि वाढवलेला गोठा दाखवू.

दुस-या दिवशी सकाळीच दोघेही परड्याकडं निघाले. मास्तरांचा ऊर भरून आलेला. मनापासनं त्यांनी सालक-यांचं, बैलाचं आणि सुतार-गवंड्यांचं कौतुक सुरू केलं. पाहुणा निमूटपणं सगळं ऐकत होता. मास्तराचं सगळं बोलून झाल्यावर पाहुण्यानं बोलणं सुरू केलं.

"गुरुजी, सालकरी केव्हा आणला?"

"झाले असतील की सहा महिने."

"सालं कायं ठरवलं?"

"त्याचं, त्याच्या कुटुंबाचं जेवणखाण, लहानग्या मुलाचं शिक्षण, वर्षाला पंधरा हजार रुपये, शिवाय कापडं."

"त्याला खोली बांधून दिलीत, शौचालयाची सोय करून दिलीत, त्याचा खर्च?"

"ते काय, होतं सामान घरचं. वासे, पत्रे, होते. दिलं करून. त्याचा खर्च असा किती येणार? अन् लक्षात पण नाही किती झाला तो."

"बरं, हा बैल?"

"बैल त्रेपन्न हजार रुपयांचा आणि आणण्याचा खर्च दोन हजार रुपये."

"गोठा?"

"तो झाला की सव्वा लाखापर्यंत. पण आता सगळं कसं सालकरी स्वतः हाताळतो. कुणाला काही मागायला नको. शेती वाढवायची म्हटली तर एवढं तर करायलाच पाहिजे ना?"

"गुरुजी, तुमची शेती किती?"

"साडेसात एकर. ती पण एका जागी नाही. दोन-तीन ठिकाणी आहे."

"म्हणजे गुरुजी, सालकरी आणल्यापासनं साधारण दोन-तीन लाखांच्या घरात गेला असलं की खर्च ?"

"हा, म्हणजे झाला असणार की तेवढा. नव्हे, सालक-यांचे जेवण-खाण, कपडेलत्ते धरून कदाचित जास्त झाला असंल, मला वाटतं!"

"काय गुरुजी! काय हा नस्ता खर्च? अन् त्याच्या पोटी उत्पन्न काय? खर्च आणि उत्पन्न यांचा मेळ बसतो का?"

"नाही. हे कॅपिटल घातलंच पाहिजे ना? अहो, शेती फायद्याची करायची तर ही जुळणी पाहिजेच ना!"-
- गुरुजी

"कशाची जुळणी अन् कशाचं काय? अहो, हे तर तुमचे कॅपिटलच आणखी काय ओढतं त्याचा विचार करा. बैल– त्याचं रोजचं खाणं. गोठा– तो काय वाढवला नसता तरी पै-यावर काम चाललंच होतं. सालक-याचा पगार, त्याचा इतर खर्च, सगळं उत्पन्नापेक्षा जास्त. कसली शेती करता राव? माझी अतीतला चौदा एकर शेती आहे. घरी एकही बैल नाही. गाय, म्हैस काही नाही. सगळं भाड्यानं करून घेतो. नांगर असो, कुळव असो. सगळं भाड्याने! शेतीला पाणी पाजायला एकाला दिवसाच्या बोलीनं रोख पैसे देऊन बागायती करतो. जनावरांचा त्रास नाही. बैलाला वैरण घालायची म्हणून काळजी नाही, काही व्याप नाही. फक्त मशागतीच्या वेळी आपण स्वतः हजर असलं म्हणजे झालं. खुरपायला बाया लावतो. सुगीच्या दिवसांत इरजिकीने काम करून घेतो. सगळी खूष असतात. आपल्याला डोक्याला ताप नाही. वर्षाला लाखभर रुपये खर्च होतो. पण रोख पैसे देतो म्हणून सगळीजणं व्यवस्थित काम करतात. कामाचे तसे दिवस किती? काम कराल तेवढेच. बाकी पिकं आपल्या मनानं वरती येतातच की! त्यांची निगा आपण ठेवू शकतोच ना? कीड-बीड पडली तर माणसं लावून फवारून घ्यायचं! आपलं काय चुकतं, आपण जनावरांची काळजी घेतो. त्यांच्या वैरणपाण्यात गुंततो. घरात कुणी त्यांची काळजी घ्यायला नसलं तर अडकून पडतो. म्हणजे काय होतं की, आपण आपल्यालाच बांधून ठेवतो; आणि खर्चही जास्त करतो. मग शेती येणार कशी फायद्यात?

"मी पण शेतीच करतो. पण त्यात गुंतत नाही. ज्या घरात शेती करायला माणसं नाहीत, त्यांनी ती बैलबारदानाची आणि सालक-याची शेती करायची म्हणजे त्यांच्यासाठी सगळं करण्याचा मूर्खपणाचा मार्ग आहे. मला तर हे पहिल्यांदाच कळलं होतं. म्हणून मी ह्या पारंपरिक शेतीत पडलोच नाही. शेतीकडे धंदा म्हणून पाहिलं. धंद्यात फायदा महत्त्वाचा. गुरं, सालकरी असलं काही करीत बसलो तर, तो तोट्याकडंच जाणारा धंदा. त्यांचं इकॉनॉमिक्स का काय म्हणतात तेच मुळात चुकतं."

मास्तरांचा हसतमुख असलेला चेहरा आता बदलू लागला. पाहुण्याचा शब्दन् शब्द पटू लागला. कारणच तसं बळकट होतं. मास्तरांना शेतीत प्रगती करायची होती. तो प्रकार किती भयानक होता, हे त्यांना पटू लागलं. मास्तर काही बोलले नाहीत.

"मग पटलं नव्हं मी काय म्हणतो ते? –" पाहुणा

"बघतो आता विचार करून कसं काय करायच ते." – मास्तर

पाहुणा अतीतला गेल्यावर मास्तरांनी बैलबारदाना, सालकरी, सगळं सगळं महिन्याभरात सोईसोईन काढून टाकलं आणि अगदी हसतहसत मला सांगितलं. शिवाय बायकोही म्हणाली, "बरं झालं, सोनारानं कान टोचलं. नाहीतर आमचं तुम्ही ऐकता व्हय?"

(२)

बाळू परटानं गावात धुणी धुऊन इस्त्री करण्याच्या दुकानापासून ते भंडा-यात खीर करून पाककौशल्य दाखविण्यापर्यंत जमतील ते धंदे करून बघितले. पण यश नाही! पण हिकमती बाळूनं धीर सोडला नाही आणि प्रयत्न थांबवले नाहीत.

एकीकडं देऊळ आणि एकीकडं चावडीपुढची, भलीमोठी चौथ-यावरची शेड अशी मधली मोकळी जागा पाहून त्यानं एक पानाचं –म्हणजे पानपट्टी, सिगरेट, गोळ्या असं एक छोटंसं दुकान टाकलं. हेतू हा की, देवळात जाणारे परत जाताना पान घेतील. आणि शेडमधली टवाळखोर मंडळी तर दुकानावर येतीलच येतील.

बाळू नुसताच धंदेखोर नव्हता. बोलभांड असल्यानं अडल्यानडलेल्याला सल्ला देण्यातही तो वाकबगार होता.

पानांसाठी प्रसिद्ध असलेल्या एका गावातून एक मास्तर रोज सायकलवरून सकाळी दहा वाजता यायचे. त्यांच्याशी संधान बांधून दररोज ताज्या पानाची एक गड्डी आणून घ्यायची, असं नियोजन त्यानं केल होतं. मास्तरांनी एकच अट घातली होती की, गावात याचा बोभाटा होऊ द्यायचा नाही. बाळूने ते मान्य केल होतं आणि सगळं सुरळीत चाललं होतं. धंद्याचा जम बसू लागला होता आणि प्रत्येकाची आवड लक्षात ठेवून त्या पद्धतीचं पानं बनवून देण्याची खुबी बाळूला जमू लागली होती.

एकदा नारायण हवालदार आणि सोपान मास्तर असे दोघे पानपट्टीच्या दुकानासमोर चर्चा करीत होते. विषय असा की, रामा दुसाळकर आणि आपण दोघं अशा

तिघांनी मिळून ओढ्याच्या काठी एक विहीर काढली तर तिघांनाही बक्कळ पाणी मिळंल आणि नाही म्हटलं तरी प्रत्येकाची एक-दोन एकर जमीन ओलिताखाली येईल. तिघांच्या जमिनी ओढ्याकाठी थोड्या पांगून पण जवळजवळ होत्या. पानपट्टी लावतालावता बाळूचे कान ह्या बोलण्याकडे गेले. विषय अगदी रंगात आलाय म्हणताना बाळूनं नारायण हवालदार आणि सोपानभाऊला हाक मारून जवळ बोलावून घेतलं.

"का रं बाळू, काय पाहिजे होतं?" – हवालदार.

"मला कशाला काय हवंय. तुम्हाला बरंच हवं असंल."

"आम्हाला?" सोपान म्हणाला.

"हे न्हवं का तुमच्या बोलण्यातनं व्हिरीचं गाणं चाललं होतं, त्यासाठनं तुम्हाला बरंच लागलं का नाही? मला काय, माझं बरं चाललंय, मला काय बी नगं."

"हं, ह्या बाबतीत म्हणतूस व्हय? मग तू काय देणार?" –हवालदार

"तसं, लई काय नाही. पण म्या सगळं धंदं करताना लई माणसांच्या वळकी झाल्यात. गवंडी म्हणू नगा, मजूर म्हणू नगा, इमारतीचं सिमेंट-पत्र्याचे सामान म्हणू नगा, सगळ्याचा दांडगा अभ्यास झालाय. आता मला नाही यश गावलं; पण ही माणसं? ती माझी संपत्तीच नव्हं का? काय लागलं तर सांगत चला, एवढं सांगायचं व्हतं."–बाळू

"असं म्हणतोस? बरं, लागलं कायबाई तर सांगू." म्हणून नारायण आणि सोपान पांगले. त्यांच्या हातावर बडीशेपेच्या दोन पुड्या ठेवायला बाळू विसरला नाही.

दुस-याच दिवशी नारायण हवालदार आणि सोपान-मास्तर यांनी रामा दुसाळकराला गाठलं. त्याला सगळा विषय समजावून सांगितला. तो काय, गावातला शेतकरी माणूस, त्याला हे सगळं लगेच पटलं. शिवाय मास्तर आणि हवालदार यांच्याकडं पैसे असणार, याची त्याला खात्री होती.

तथापि हा विषय रात्री बायकोशी बोलून मग निर्णय घ्यावा असा विचार रामाच्या मनात येऊन गेला. रामाची बायको व्यवहारात हुशार होती.

"नव्हं, नारायण हवालदार अन् सोपानमास्तर भेटले होते. तिघांत मिळून आपल्या वस्तीनजीक एक हीर काढू असं म्हणत होते." – रामा

"मग तुमचा काय विचार?" –बायको

"अगं, तुला मी इचरावं म्हणून, नव्हं का तुला इचारतोय?" –बाळू

"काढा जावा की. मी कशाला आडवी पडू?"

"तुझं असं कसं गं? इचारलं की सरळ बोलतच नाही."– बाळू

"आता ह्यात काय मी वाकडं बोलले?"–बायको

"बऽरं, सांग तुझा इचार."

"नाही, हरकत नाही. तर लई मोठं गानं हुणार! पैशाची जुळवाजुळव, पाण्याची खात्री, बांधकामाची जबाबदारी,–लई भानगडी येत्याल. आपण एकल्यानं केलं तर हरकत नसतीया, पण दुसरं कोणी बरोबर असलं तर त्याचं बी गानं ऐकावं लागतं."

"म्हंजी मला बी तसंच वाटतं. पन एवढा मोठा साखर कारखाना हे पुढारी सहकारातनं उभारत्यात; अन् आपल्याला तर तिघांनाच हे पेलायचं. सगळ्यांनी इचारानं केलं म्हणजी झालं."

"काय बया हे तुमचं बोलणं? अवं, तिथं त्यांच्या खिशातलं जायचंच नसतं. अकरा रुपयाचं सभासद होत्यात अन् आपल्यासारख्याकडून मतं मागून चेअरमन होत्यात. त्यांचं काय सांगता मला?"

"बापरे! तू लईच पुढचं बोलतीस. तुझं डोकं कसं चालतं ते देवाला बी कळाचयं नाही. मी तर काय, शेतकरीमाणूस."

"हे बघा, तुम्हाला काय करायच ते करा. माझं काय बी म्हणतं नाही.!" आणि बायको गेली स्वयंपाक-घरात निघून.

खरंतर बाळूला बायकोचा हा विचार पटला होता. पण हे नारायण हवालदार अन् सोपानमास्तरला सांगितलं तर दोघंही हसतील अन् बायल्या म्हणतील, याची रामाला लाज वाटली.

झालं! तिघांच्या रामा दुसाळकराच्या शेतीतल्या वस्तीवर बैठकी होऊ लागल्या. प्रत्येकानं पैसे किती घालायचे, सामान कुणी आणायचं, गवंडी-मजूर, कुणी मिळवायचे असे विचार जो तो मांडू लागला. शेवटी

असं ठरलं की, रामा दुसाळकराच्या जमिनीलगतच विहीर काढायची असल्यानं आणि त्याची गुंठाभर जमीन विहिरीसाठी लागणार असल्यानं त्याला थोडी सवलत द्यायची . मात्र तो हिशेब सगळ्याच्या शेवटी करायचा. सध्या तिघांनी सारखेच पैसे घालायचे.

रामाने गडी गोळा करून विहिरीसाठी ओढ्यालगत खड्ड्याची जागा निवडली. पानाड्याला बोलवून आणून त्या जागेत पाणी लागेल, याची खात्री करून घेतली. पानाड्याला ५०० रुपये दिले. तो पहिला खर्च वहीत नोंदला गेला.

हवालदार आणि मास्तर पैशाच्या जुळणीस लागले. बँकेकडून, काही मित्रांकडून उसने, काही सासुरवाडीकडून अशी पैशांसाठी त्यांची धावपळ सुरू झाली. रामा मात्र मजूर आणि गवंडी साथीला घेऊन विहिरीच्या खड्ड्यासाठी मनापासून कामाला लागला. आपली थोडी जमीन जाईल, पण हे झालं पाहिजे, अशी त्याची तळमळ.

इकडं बाळू सिमेंट, खडी, वाळूचे व्यापारी यांना गाठून, "मी सांगेन– चिठ्ठी पाठवेन, तेव्हा तेव्हा तो तो माल लगेच द्यायचा; प्रसंगी आठ दिवसांची उधारी खपवून घ्यायची,"असं सांगून आला. गि-हाईक पाठविण्यासाठी काही कमिशन सांगायलाही तो विसरला नाही.

खड्डा खोल जाऊ लागला. कधी जांभा, तर कधी तांबडा थर असा भोवतालच्या गोलात दिसू लागला. तेव्हा पाणी हमखास लागणार, आणि तेही जमिनीतून उमाळ्याचं जिवंत पाणी लागणार; यावर दररोज गप्पा सुरू झाल्या आजूबाजूचे शेतकरी कुतूहलाने डोकावून जाऊ लागले.

होता होता चाळीस फूट खोल गेल्यावर पाण्यानं दर्शन दिलं. मग काय तो आनंद वर्णावा! पाणी ओढ्यातल्या पाझराचं का खडकातला उमाळ्याचं हे समजेना. पानाड्याला विचारावं तर तो पार मराठवाड्यात गेल्याचं कळलं होतं. पाणी जिवंत असणार अशी समजूत करून घेऊन तिघांनीही बांधकामाची तयारी सुरू केली. एकाच्या ठिकाणी दोन गवंडी नेमले. माती वर काढण्यासाठी यारीची व्यवस्था झाली. सुरुवातीला बामणाला बोलवून पाण्याचं पूजन झालं. जमलेल्यांना अस्सल सातारी पेढ्यांचं वाटपही झालं.

ओढ्यातल्या खडकातनं काढलेल्या पाषाणाचे योग्य आकाराचे तुकडे पाडण्यासाठी वडाराची जोडी जोमानं काम करू लागली. बैलगाडीनं ते डबर आणण्यासाठी सोपानाची धावपळ सुरू झाली. तोवर बाळूची चिठ्ठी घेऊन बाजारच्या गावातल्या व्यापाराकडून सिमेंट आणि वाळू आणण्यासाठी दोघेही बाजाराच्या गावाला गेले. चहा देऊन व्यापा-याने दोघांचा पाहुणचार केला. दुस-याच दिवशी वाळूचा ट्रक आणि सिमेंटची १०० पोती येऊन पडलीदेखील! तळाचा गोल भाग बांधायला सुरुवात झाली.

विहिरीचं बांधकाम म्हणजे खड्ड्यात खूप आरडाओरडा. गवंडी मजुराला, मजूर एकमेकांना हाकारणार असा सकाळपासून संध्याकाळपर्यंत गोंधळ चालू असायचा. एका बाजूनं यारीनं माल वरओढायचा आणि दुस-या बाजूनं बांधकाम करायचं असं ठरलं आणि काम अगदी वेगाने सुरू झालं. गवंडी हातात थापी घेऊन एखाद्या योद्ध्यासारखा बांधकामाशी झटत होता. खालचा पहिला घर दोन-तीन दिवसांत झाला. आता जई (विहिर पडू नये म्हणून घर लागेपर्यंत खणलेली जमीन) कुठं सोडायची याचा अंदाज घेण्यासाठी शिडी लावून त्यांने माप घ्यायला सुरुवात केली. तोच शिडी निसटली आणि गडी खाली आला; आला म्हणजे उताणाच पडला. त्याच्या उजव्या हाताला जबर मार लागला. झालं! बांधकाम थांबलं. "माझीच चूक आहे," असं म्हणून त्यान रामाची आणि सोपानाची माफी मागितली. पण आता त्याला काम करता येण्यासारखं नव्हतं.

गावात तितका वाकबगार गवंडी नव्हता. त्याच्या हाताखालच्याला विहिरीच्या बांधकामाचा अनुभव नव्हता. म्हणजे आता शेजारच्या गावातनच गवंडी आणावा लागणार होता. एक-दोन दिवस गेले. अखेर "सवड काढून येतो," म्हणणा-या गवंड्याला रामानं चार दिवसानं विहिरीच्या जागी आणलं.

आल्याबरोबर त्यानं सगळा परिसर आणि विहिरीचा खड्डा नीट न्याहाळला. आणि तो म्हणाला "ही हितं कशी विहीर धरली? ओढा जवळ आणि माती ठिसूळ म्हटल्यावर हे बांधकाम टिकलं का?"

"का? असं का म्हणता?" –रामा.








"नाही, हे जरा डेन्जरस वाटतं मला. मधनंमधनं माती ढासळ्यालेली बी दिसती!"

"अवं पानड्याला दावून विहिर धरली." -रामा

"हे बरोबर हाय. त्याचं काम काय, पानी लागंल का न्हाय ते सांगायचं. पण बांधकाम टिकंल का न्हाय हे त्याला कसं कळणार-?" -गवंडी.

"म्हंजी त्याला कळंना अन् तुम्हाला कळतंय व्हय?" -रामा.

"हे बघा, म्या आपलं माझं मत सांगितलं. मला काय, तुम्ही बांधा म्हणला, बांधतो! पण नंतर म्हणू नगा माझ्या कामात खोट होती म्हून व्हीर ढासळली."- -गवंडी

"तुम्ही तर राव ढासळण्याचं बोलता. आपन ती बांधायची हाय न्हव?"- रामा

"मी बांधकामसारनंच आलोय नव्हं? का पाडायसाठनं?" -गवंडी.

रामाच्या डोक्यात संशयाचा किडा घुसला.

"बरं, मग कसं करता?" -रामा

"बांधा म्हटलं तर सुरुवात करतो. मला काय? दुसरं काम मागं टाकून आलो ते काय उगीच?"

तंवर संध्याकाळ झाली. काम आटपून सोपान आणि नारायणही तिथे आले. हो-ना करता करता जरा जास्त सिमेंट, खडी, वाळू वापरून काम मार्गी लावायचं ठरलं.

दुस-या दिवशी रामा, नारायण आणि सोपान सकाळीच साइटवर हजर झाले. येण्याअगोदर जोतिबाला नवस करून आले. "बाबा रे, हे व्हिरीचे बांधकाम चांगलं तडीला जाऊ दे. काहीतरी तुझ्या पायावर ठेवू. उगाच इपरीत नगं व्हायला."

गवंडीही वेळेवर आला. त्यानं त्याचं सगळं कौशल्य पणाला लावलं आणि बांधकामाचे थरावर थर चढू लागले.

महिनाभराने बरंच काम वरती आलं. आता काही धोका नाही, असं सगळ्यांनाच वाटू लागलं. हवालदार आणि मास्तर दोघंही आता दररोज सकाळीच साइटवर हजर होऊ लागले. थोडी मनात शंका असायची की, विहिरीत फूटभर पाणी का असतंय? वाढंना का? पण सगळेच समजूत करून घ्यायचे की, थोडा गाळ काढल्यावर बक्कळ पाणी लागंल.

बांधकाम पूर्ण झालं. आता ज्याचेत्याचे पैसे देऊन व्यवहार पूर्ण करायची वेळ आली. मास्तराच्या आणि हवालदाराच्या वाट्याला खर्च एक-एक लाख आला. रामाच्या वाट्याला, जमिनीचे पैसे सोडून पंचाहत्तर हजार रुपये आले. यारीचे पैसे तेवढे नंतर द्यायचे ठरले. कारण थोडा गाळ काढायचा राहिला होता. आता इलेक्ट्रिक मोटार बसविण्याची, त्याच्यासाठी पळापळी करण्याची वेळ आली होती.

दोन-तीन दिवस गेले असतील. एकदम सकाळीच वारा सुटला. ढग दाटून आले आणि अवकाळी पावसानं जी झोडपायला सुरुवात केली, की विचारू नका. ओढ्याला तांबडंशार पाणी आलं. हळूहळू वाढू लागलं. विहिरीपाशी तर कुणीच नव्हतं. रामा वस्तीवरच होता. त्याला लांबवर काहीतरी मोठा आवाज झाल्याचं जाणवलं. त्याला वाटलं, आसपास एखादं झाड पडलं असावं. तरी शंका आली म्हणून छत्री घेऊन तो विहिरीकडं निघाला. जवळ जातो आणि पाहतो तर काय, संपूर्ण विहिरीचं बांधकाम ढप्पदिशी विहिरीच्या खड्ड्यात पडलेलं दिसलं. पाऊस उघडला. विहिंरीकडं गेलं पाहिजे म्हणून नारायण आणि सोपानमास्तर विहिरीवर आले.

तिघांची डोकी सुन्न! क्षणभर कुणीच कुणाशी बोलंना. नारायण हवालदार एकदम बोलला, "हाय, यावर बी उपाय हाय माझ्यापाशी. रामाच्या वस्तीवर रात्री जमूया. सांगतो तिथं काय ते." असं म्हणून हवालदार सायकलवर टांग मारून निघून गेला.

रात्री तिघे जमले. हवालदारांनी पिशवीतून 'व्हॅट ६९' ची बाटली काढली आणि चकणा काढला. "ह्यो तो उपाय"!

ઉઉઉ

अनुक्रमणिका

# समकालीन आव्हानांच्या परिप्रेक्ष्यातून शिवाजीमहाराजांचा विचार

श्री. मा. भावे

समकालीन समस्यांच्या संदर्भात शिवाजीमहाराजांचा विचार करायचा म्हणजे, एका अर्थाने राजांना त्यांच्या काळाच्या व परिस्थितीच्या कोंदणातून उचलून एका नव्या चौकटीत ते बसू शकतात की नाही, याचा अंदाज घेण्यासारखे आहे आणि हा प्रयास अवघड व जोखमीचाही आहे.

अवघड यासाठी आहे की, महाराजांचे कार्य ज्या काळात, ज्या परिस्थितीत घडले, त्या काळाची व परिस्थितीची समजूत पटणे हे दुस्तर आहे. आपण परिस्थिती जाणून घेण्यासाठी व परिस्थितीची वर्गवारी करण्यासाठी ज्या संकल्पना आज वापरतो, त्या संकल्पना राजांच्या काळासाठी वापरणे वाजवी ठरेलच, असे नाही. उदा., राष्ट्र, लोकशाही, कायद्याचे राज्य, समाजवाद, धर्मनिरपेक्षता अशांसारख्या सध्या प्रचलित असणा-या संकल्पना त्या काळच्या लोकांच्या मनातही आल्या नव्हत्या. आणि कोणाच्या विचारात आल्या असल्याच, तर त्यांचा जो बोध आज आपल्याला होतो, तोच त्या विचारकांना अभिप्रेत होता, असे सांगता येत नाही.

याहून मूलगामी अशी अडचण जी आहे ती ही की, त्या परिस्थितीची माहिती करून देणारे विश्वसनीय दस्तऐवज फारच थोडे आहेत. महाराज अमुक प्रश्नाविषयी नेमका कसा विचार करीत असत, त्यांच्या मसलतखान्यात वाद-संवाद कसे घडत, आग्र्याला जाण्याचा निर्णय राजांनी कोणत्या हेतूने घेतला, राज्याभिषेकाचा समारंभ करण्यामागे राजांचे उद्दिष्ट काय होते, यांविषयी आपल्याला फक्त तर्क करावे लागतात आणि त्या तर्कांना कोणत्याही कागदांचा आधार असत नाही. त्या काळी दरबाराची किंवा मंत्रिमंडळाच्या बैठकींची इतिवृत्ते ठेवली जात नव्हती. त्यामुळे विशिष्ट निर्णय कोणत्या उद्देशाने व कधी घेतला हे कळण्यास साधन नाही. राजांनी आपल्या थोडक्या सैन्याच्या जोरावर मोघल किंवा विजापूरकर यांच्या मोठमोठ्या फौजांना धूळ चारली, असे आपण म्हणतो; पण तसे करताना त्यांनी व्यूहरचना कोणती केली, सैन्याच्या तुकड्यांच्या नायकांना निरोप कसे पोचत, झपाट्याने सैन्याच्या हालचाली कशा होत, याची काहीच खात्रीलायक माहिती आपणास मिळत नाही.

पण साडेतीनशे वर्षांपूर्वी काय घडले याचा शोध घेणे लांबच राहू द्या; सध्या आपल्या भोवती काय घडते आहे याचा तरी भरवसा ठेवावा अशी माहिती आपल्याला कोठे असते? गेल्या वीस-पंचवीस वर्षांतील अनेक घटना सांगता येतील की, ज्या अजून रहस्यातच गुरफटलेल्या आहेत. एकोणीसशे त्र्याण्णव साली याच मुंबई शहरात बॉंबस्फोट झाले व त्यांत शेकड्याने माणसे गेली. पण या थरारक घटनेचा पुरा उलगडा झाला आहे, असे म्हणता येते का? अशी जर समकालीन घटनांबद्दलची स्थिती असेल, तर शिवाजीराजांच्या पुढे असणा-या प्रश्नांविषयी आपण जे बोलू, त्याची विश्वसनीयता कितपत असेल? सांगायचा मुद्दा असा की, मी आता जे बोलेन आणि या परिसंवादात येथून पुढे अभ्यासक जे बोलतील, त्यात कापूस पिंजण्याचं काम पुष्कळच असेल. त्यातून जे थोडे तथ्य हाती येईल, त्याचा आपण सर्वांनी मोकळ्या मनाने साधकबाधक विचार करावा, इतकेच मी म्हणू शकतो.

(१)

शिवाजीमहाराजांचा विचार करायचा झाल्यास तो तीन अंगांनी करावा लागतो. त्यांच्या आयुष्यात घडलेल्या घटना, त्यांच्या कर्तृत्वातून निर्माण झालेले विचार आणि काळाला वळण देणारे काम; तिसरा भाग म्हणजे त्यांचे चारित्र्य आणि मूल्यधारणा. अशा त-हेचा विचार फक्त शिवाजीराजांच्या बाबतीत संभवतो असे नाही. कोणाही ऐतिहासिक पुरुषाचा विचार या तीन दिशांनी केल्यास उद्बोधक ठरतो.

घटनांचा विचार करायचा म्हणजे दोन बाजू पुढे येतात. पहिली बाजू म्हणजे घटना नक्की कशी घडली,

अनुक्रमणिका

हे पाहणे आणि दुसरी म्हणजे ती घटना तशीच का घडली, तेवढी एकच शक्यता होती का, हे तपासणे. शिवाजीराजांच्या बाबतीत प्रत्येक घटनेविषयी असा विचार करणे बौद्धिक दृष्ट्या रंजक आणि उद्‌बोधक ठरते. उदा., राजांनी अफजलखानाला ठार केले, ही घटना नक्की कशी घडली, यासाठी निरनिराळी कागदपत्रे किंवा दस्तऐवज पाहावे लागतात. त्या दस्तऐवजांची प्रतवारी व विश्वसनीयता यांबद्दल निर्णय घ्यावा लागतो. इतके असूनही सर्व तपशिलांसह घटना आपल्या आकलनात येतेच असे नाही. किंबहुना आपल्या दृष्टीने अफजलखानाची हत्या हा प्रसंग म्हणजे त्या प्रसंगाविषयी आत्तापर्यंत निर्माण झालेल्या सर्व दस्तऐवजांची किंवा कागदपत्रांची चळत हीच होय. कारण आपणांपैकी कोणीच त्या प्रसंगी हजर नव्हते आणि त्या काळचे जे लोक आपण तेव्हा हजर होतो असा दावा करतात, त्यांचा शब्दही इतर पुराव्यावरून तपासून घ्यावा लागतो.

ऐतिहासिक प्रसंग म्हणजे त्या प्रसंगाबाबतच्या कागदपत्रांची चळत असे एकदा म्हटल्यानंतर घटनेची तपासणी करण्याची जी दुसरी बाजू आहे, ती सहजच समोर येते. या पुराव्याच्या कागदांतील निवेदने इतकी वेगवेगळ्या त-हांची असतात की, अफजलखानाच्या हत्येच्या अनेक पर्यायी शक्यता आपल्याला समजून येतात. या शक्यतांतून इतिहासकाराला जी जास्तीत जास्त संभवनीय स्थिती वाटते, ती निवडावी लागते. ती निवड केल्यानंतर हेही समजावून द्यावे लागते की, त्याने केलेली निवडच कशी चोख आहे. अर्थात यातून घडते काय, तर अफजलखानाच्या हत्येविषयी एक नवे निवेदन तयार होते.

पण अशा एक-एक घटना आपण कालानुक्रमाने लावत गेल्यावर रांगोळीच्या ठिपक्यांतून जशी आकृती जमवावी लागते, त्याप्रमाणे या घटनांच्या क्रमवारीतील सूत्र शोधावे लागते. हे सूत्र शोधताना ब-याचदा असे होते की, निरनिराळ्या घटना आणि त्या घटनांचे तपशील हे सगळेच सूत्रात पकडले जात नाहीत. अशा वेळी काही तपशिलांकडे आणि तथ्यांकडे दुर्लक्ष करावे लागते. उदा., शिवाजीराजांच्या आयुष्यातील घटनांकडे पाहून कोणी इतिहसकार म्हणेल की, राजांना हिंदूंचे राज्य स्थापन करावयाचे होते. अशा वेळी या सूत्राला बिरोधी असे तपशील तो इतिहासकार नजरेआड करतो. जसे की, राजांच्या पदरी अनेक मुसलमान किंवा इतर धर्माचे अधिकारी व सैनिक होते. तसेच कित्येक मशिर्दीना त्यांनी उत्पन्ने लावून दिली होती. सारांश, कुठलेही सूत्र इतिहासकाराने बसविले तरी काही ना काही गोष्टीकडे दुर्लक्ष करावे लागते. इतके असूनही इतिहासकार सूत्र शोधण्याचा प्रयत्न करतात, याचे कारण सूत्र बांधणे हा मनुष्याच्या आकलनपद्धतीचा हा अनिवार्य भाग आहे.

अनेकदा घटनांकडे पाहताना दोन गोष्टी आपल्या लक्षात येतात. पहिली म्हणजे त्या घटनेचा जो नायक असतो, तो आपल्या प्रतिभेने परिस्थितीवर असा कबजा मिळवतो की, त्यामुळे घडलेली घटना त्यापेक्षा निराळी होणे शक्यच नव्हते, अशी खात्री पटते. शिवाजीराजांच्या बाबतीत हे आपल्याला अनेकदा प्रभावीपणे कळून येते. उदा., राजांनी आग्र्याहून आपली सुटका करून घेतली. ती कशी करून घेतली याबद्दल अनेक मते असू शकतील. परंतु कसेही असले, तरी औरंगजेबासारख्या करारी आणि कारस्थानी शत्रूच्या कचाट्यातून बाहेर पडणे या किमयेसाठी फार वेगळ्या त-हेची बुद्धिमत्ता व नियोजन लागले असणार, हे उघड आहे. नायकाची प्रतिभा किंवा दीर्घदृष्टी याची प्रचिती अशा निर्वाणीच्या प्रसंगातून येत असते. आणि ती खात्री पटली, म्हणजे आपण म्हणतो की, तो विशिष्ट प्रसंग असाच घडला असला पाहिजे. राजे आग्र्याला अटकेत असताना ज्या बिविध शक्यता होत्या, त्यांतील राजांनी सुखरूप महाराष्ट्रात येणे हीच शक्यता प्रत्यक्षात आली याला कारण राजांची प्रतिभा हेच होय.

या बाबतीत आणखीही एका गोष्टीचा विचार करावा लागतो. ती म्हणजे आकस्मिकता. कोणत्याही प्रसंगी निरनिराळ्या अनेक शक्ती कार्यरत असतात. प्रसंगाच्या नायकाला त्या सर्व शक्तींचा अंदाज आलेलाच असतो, असे नाही. त्यामुळे कितीही काळजीपूर्वक नियोजन केले, तरी अचानक निराळेच संकट उभे राहण्याचा संभव असतो. जसे की, राजांच्या आग्र्याहून सुटकेच्या बाबतीत अचानक पाऊस पडणे, नद्यांना पूर येणे, दरड कोसळणे, आजारपण येणे किंवा कोण्या फितुरी माणसाने

शत्रूला खबर देणे अशा काहीही अडचणी येऊ शकत होत्या. त्यामुळे राजांचा मार्ग अडला असता तर टेहळणीवर असणा-या शत्रूच्या टोळ्यांनी त्यांना पकडलेही असते. आपण जेव्हा नायकाच्या प्रतिभेचा विचार करतो, तेव्हा आपण ह्या आकस्मिकतांच्या अनुपस्थितीमुळे त्याला जी मदत झाली, तिच्याकडे दुर्लक्ष करतो.

अर्थात शिवाजीमहाराज किंवा त्यांच्यासारख्याच इतर कर्तृत्वशाली व्यक्ती यांचा विचार केवळ त्यांच्या आयुष्यातील प्रसंग आणि त्यांची प्रतिभा एवढ्यावरच थांबून चालत नाही. अनेक गुन्हेगार असे असतात की, त्यांच्या आयुष्यात लोकविलक्षण घटना घडतात आणि त्या थरारक प्रसंगांतून निसटून जाताना त्यांनी वापरलेले चातुर्य, शौर्य आणि बेधडकपणा यांचे नवल वाटते. परंतु तेवढ्याने ते गुन्हेगार थोर होत नाहीत. त्याला कारण असे की, त्यांची उद्दिष्टे आणि त्यांनी वापरलेली साधने यांच्याविषयी कोणताच मूल्यविवेक त्यांच्या मनात नसतो.

इथे साहजिकच असा प्रश्न येतो की, शिवाजी–राजांनी जोपासलेली मूल्ये आणि आज ज्या मूल्यांची धारणा आपल्या ठिकाणी आहे ती मूल्ये, सारखीच असतील असे नाही. अशा स्थितीत शिवाजीराजांची मूल्ये स्पृहणीय होती, असे आपण कसे मानावे? उदा., अनेक प्रसंगी शिवाजीराजांनी गुन्हेगारांना केलेल्या शिक्षा आपणांस क्रूर किंवा अमानुष वाटतात. त्यांनी स्त्रीवर अत्याचार करणा-या एका पाटलाचे हात-पाय तोडले किंवा खंडोजी खोपडे अफजलखानाला मिळाला या कारणासाठी, खंडोजी शरण आल्यानंतरही, त्याचा एक हात व एक पाय कापला. ह्या प्रकारचा न्याय आपण मान्य करू शकू का?

अशा ठिकाणी आपल्याला इतकेच म्हणता येईल की, शिवाजीराजे ज्या युगात वावरत होते, त्या युगात गुन्हेगार आणि त्यांना करावयाच्या शिक्षा या बाबतीतला विचार आजच्याइतका विकसित झालेला नव्हता. शिवाजीराजांच्या बरोबरचे इतर राज्यकर्तेदेखील याच त-हेच्या शिक्षा देत असत. आज शिवाजीराजे असते तर, राजांचे चरित्र लक्षात घेता, त्यांनी अशा त-हेच्या एकांगी शिक्षा न देता व्यापक विचार करून गुन्हा व शिक्षा यांची योग्य ती सांगड घातली असती.

मुद्दा असा की, राजांच्या चरित्राचा आजच्या संदर्भात विचार करताना राजांवर असलेली त्या काळातील प्रथांची बंधने आणि प्रचलित विचारसरणी यांतून मुक्त होण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी किती होते, याचा अंदाज घ्यावा लागतो. तसे केले नाही तर आजच्या समस्येच्या संदर्भात महाराजांच्या कार्यकर्तृत्वाविषयी मत बनविताना आपण त्यांच्यावर अन्याय करण्याची शक्यता असते.

(२)

राजांच्या ठिकाणी आपल्या काळातील सरंजामदारी मनोरचनेतून थोडे बाजूला जाऊन विचार करण्याची प्रतिभा होती. याचा पुरावा त्यांच्या काळातील इतर राज्ये कशी चालत होती आणि स्वराज्य त्यापेक्षा किती निराळे होते, याचा अभ्यास केल्यावर मिळतो.

मोगल राज्यात राजवट आणि प्रजाजन यांच्यातील संबंध अत्याचारकर्ता आणि अत्याचाराचा बळी यांच्यातील संबंधांप्रमाणे होते. मोगल साम्राज्यात जमीनमहसूल गोळा करण्याचे मक्ते मामलेदारांना दिलेले असत. मामलेदाराने ठरीव रक्कम सरकारकडे द्यावी आणि स्वतः रयतेकडून कसाही व कितीही महसूल गोळा करावा. परिणाम असा होई की, रयत देशोधडीला लागे आणि मोठमोठाले प्रदेश ओसाड पडत. ही गोष्ट फ्रान्सिस्को पेलझाएर्ट या डच प्रवाशाने लिहून ठेवली आहे. तो म्हणतो की, ज्या भागातून रुपये ५० हजार इतका वसूल व्हायचा, त्या प्रदेशातून निम्मादेखील पैसा वसूल होत नाही. कारण शेतकरी शेती सोडून पळून जातात व दरोडेखोरांना सामील होतात. रियासतीचे नोकरलोक प्रजेकडे इतके दुर्लक्ष करीत व जुलूम करीत की, सा-या प्रदेशाची धुळधाण होऊन गेली होती. फ्रांस्वा बर्नियें हा फ्रेंच डॉक्टर १६५८ पासून पुढे दहा वर्षे हिंदुस्थानात होता; त्यानेही हेच लिहिले होते.

तो म्हणतो, 'हिंदी साम्राज्यातील अनेक प्रदेशांची वाळवंटे किंवा वैराण डोंगराळ भाग झाले आहेत. जमिनींची मशागत होत नाही व जनसंख्या क्षीण होत चालली आहे. बरीचशी शेतजमीन मशागतीविना राहिली आहे; कारण काम करायला माणसेच नाहीत. सुभेदाराच्या जुलमामुळे वस्त्या उठून गेल्या आहेत...रयतेजवळची

सर्व चीजवस्तू सुभेदार, मामलेदार ओरबाडून घेतात.' मोगली कारभारच असा जुलमी व छळ करणारा होता, असे नाही. आदिलशाही व कुतुबशाही सल्तनतींचा कारभारही तसाच जाचक होता, अशी साक्ष डच व इंग्रज व्यापा-यांनी दिली आहे. [त्या प्रकारचे एकत्रित उल्लेख (१) या संदर्भ ग्रंथातील पान ४१ ते ४५ येथे आहेत.]

आपल्या ठिकाणांहून उठून गेलेली ही प्रजा काय करीत असे? कोणातरी बंडखोराच्या आश्रयाला राहून ती राज्यकर्त्यांविरुद्ध विद्रोह करून उठे. अशा वेळी केंद्रसत्ता मोठी सैन्ये पाठवून व क्रूरतेची कमाल करून बंडाचा बीमोड करी. ही सैन्ये १२,००० घोडेस्वार व २०,००० पायदळ इतकी मोठाली असत. पीटर मंडी नावाच्या ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकराने या मोगली फौजा प्रजेवर जो सूड उगवीत, त्याचे वर्णन केले आहे. तो लिहितो, 'मी एक दिवस (कोईल नावाच्या) गावाबाहेर फिरायला गेलो असताना मला रत्याच्या एका बाजूला चुन्याचे ढीग रचलेले दिसले. या ढिगांना जाळी केलेली असून त्या जाळीत लोकांची मुंडकी खोचून ठेवलेली होती. प्रत्येक ढिगारा ११-१२ फूट उंचीचा होता व पायाचा परीघही तितकाच. (मंडीने अशा ढिगा-याचे चित्रही काढले आहे.) या मुंडकी उडवलेल्या माणसांची धडे आंब्याच्या झाडांच्या फांद्यांना उलटी टांगून ठेवलेली होती!' बंड इतक्या दुष्ट पद्धतीने दडपून टाकण्यात येत असले, तरी पुनःपुनः बंडे होतच होती.

ज्या ठिकाणी बंडे होत, त्या ठिकाणच्या बंडात सामील न झालेल्या प्रजेलाही लष्कराचा उपद्रव होत असे. लष्कर गावांवर छापे घाली. प्रतिकार करणा-या गाववाल्यांना चोप देई. गावातील गुरे उचलून घेऊन जाई. पण अशा अत्याचारांना सोसत साम्राज्याच्या निरनिराळ्या सुभ्यांतील प्रजा वारंवार बंडे करीतच राही. (वरील पुस्तक, पान ४८-४९)

थोडक्यात म्हणजे प्रजेला सुखदायी कारभार करून, तिचा विश्वास मिळवून व तिची समृद्धी वाढावी असे उपाय वापरून आपली प्रतिष्ठा न वाढवता प्रजेला धाकात ठेवून व जुलूम करून तिच्यावर अंमल गाजवावा, एवढीच राज्यकारभाराची रीत बादशहांना माहीत होती.

मोगल बादशाहीचा कारभार असा जुलमी असण्याचे एक कारण हेही होते की, आपण येथील बहुसंख्य हिंदू प्रजेपेक्षा निराळे व बाहेरून आलेलो आहोत, ही भावना सर्वच बादशहांची होती. फ्रेंच प्रवासी बर्नियर याने ही गोष्ट ओळखली होती. 'सामर्थ्यशाली मोगल बादशहा हिंदुस्थानाला परका आहे. आपण एका आपल्याशी शत्रुत्व बाळगणा-या प्रजेवर राज्य करीत आहोत,' याची त्याला जाणीव आहे. येथील जनतेत मुसलमान व हिंदूंचे प्रमाण एकास शंभर असे भरेल. त्यामुळे बादशहाला मोठमोठी व खर्चिक सैन्ये कायमची पोसावी लागतात.' (वरील पुस्तक, पान ५०) विजापुरी किंवा कुतुबशाही बादशाह्या शिया पंथीयांच्या असल्या, तरी मोगलापेक्षा वेगळ्या नव्हत्या.

मोगलांच्या राज्यात काय किंवा आदिलशाही वा निजामशहीत काय, प्रजेतील हिंदू समुदायाला शत्रुत्वाची वागणूक मिळत असे. मुस्लिमेतरांवर –म्हणजेच हिंदूंवर– 'जकाते हिंदवानी', 'जिझिया' किंवा 'बुतपरवरिश' (म्हणजे मूर्तिपूजेसाठी भरावयाचा कर) असे कर लादले जात. आपल्या प्रजेपैकी बहुसंख्याक समुदायाला शत्रू मानून त्यांचा तिरस्कार करणारे सरकार हे साहजिकच केवळ सैन्यबळ, अत्याचार व जुलूम यांच्या साहाय्यानेच कारभार करू शकते.

(३)

शिवाजीराजांची राज्यपद्धती याच्या अगदी उलट होती. शिवाजीराजे स्वतः हिंदू होते, मूर्तिपूजक होते, त्यांनी स्वतःला राज्याभिषेक हिंदू पद्धतीने करून घेतला, हे सगळे खरे. पण आपल्या प्रजेत त्यांनी हिंदू मुसलमान असा भेद कधी केला नाही. त्यांच्यावर वेगळे कर लादले नाहीत किंवा अत्याचार केले नाहीत.

बादशहा करवसुली मक्त्याने देत असत. हे मक्तेदार प्रजेकडून पैसे हबकावीत आणि ठरीव रक्कम सरकारात देत. गांजून गेलेली प्रजा बंड करीत असे, हे आपण पाहिले. स्वराज्यात जमीनमहसूल ठरलेल्या दराने सरकारी नोकर वसूल करीत. बादशहांच्या राज्यात वतनदारांकडे करवसुलीचे काम असे व ते भरमसाट कर घेऊन सरकारात थोड्याच पैशांचा भरणा करीत. ही पद्धत राजांनी बंद केली. स्वराज्यात प्रजेने राज्याविरुद्ध उठाव








केले अशी स्थिती कधीच आली नाही. प्रजेला दडपण्यासाठी सैन्य वापरण्याची वेळही आली नाही.

राजांनी मुस्लिम प्रजेला शत्रुत्वाची किंवा वेगळी वागणूक कधी दिली नाही. त्यांच्या मशिर्दींना चालत असलेली उत्पन्ने बंद केली नाहीत. मात्र नवीन मशिर्दींना उत्पन्ने लावून दिल्याचे दाखले सापडलेले नाहीत. राजांनी कोणासही जहागिरी दिल्या नाहीत. अधिका-यांना रोख पगार देण्याची व्यवस्था केली. वतनदारी नाहीशी करणे व्यवहारात शक्य नव्हते; कारण स्वराज्यस्थापनेत देशमुख--देशपांड्यांनी राजांना मदत केली होती. पण या वतनदारांना त्यांनी शक्तिशाली होऊ दिले नाही. त्यांच्या गढ्या व तटबंद्या पाडून टाकल्या. कर गोळा करण्याचा अधिकार काढून घेऊन त्यांच्या आर्थिक नाड्या आवळल्या. साहजिकच, राज्य व रयत यांच्यातील मध्यस्थांची संस्था कमी झाली. स्वराज्य हे लोकप्रतिर्धींनी चालवलेले राज्य नव्हते. पण ते लोकांच्या पाठिंब्यावर आधारलेले राज्य होते, हा सुलतानी राज्ये व स्वराज्य यांतील महत्त्वाचा फरक होता. लोकांचा जो पाठिंबा स्वराज्याला होता तो लोकानुनयातून निर्माण झाला नव्हता, तर 'हे लोककल्यानासाठी चाललेले राज्य आहे' असा विश्वास असल्याने मिळत होता. आज आपले लोकशाही राज्य आहे व लोकांची मते मिळवून पक्ष सत्तेवर येत असतात. त्यामुळे प्रत्येक लोकप्रतिनिधीला आपले मतदार खूश ठेवले पाहिजेत, असे वाटते. साहजिकच मतदारांतील दबावगटांनी केलेल्या मागण्या पुरविण्याच्या खटपटीत तो लोकप्रतिनिधी राहतो व व्यापक हिताकडे दुर्लक्ष होते. हा दबाव टाळण्यासाठी अलीकडे असे दिसू लागले आहे की, सरकार न्यायपालिकेकडून संरक्षण घेते. अगदी साधे उदाहरण म्हणजे उत्सवाच्या काळात होणारा गोंगाट. खरेतर पोलिसांना वाद्ये बंद पाडण्याचे अधिकार सरकारने दिले पाहिजेत. पण लोकांच्या मर्जीखातर सरकार ते करू शकेना. तेव्हा न्यायालयाकडून वाद्यबंदी मागवावी लागली. लोकप्रतिनिर्धींनी लोकांची खुशामत करायची नसते, तर प्रसंगी लोकहितही हाती घ्यायचे असते. बैलगाड्यांची शर्यत हेदेखील लोकरंजनानेच उदाहरण आहे.

आपण पाहिले की, स्वराज्यात करवसुली सरकार रयतेकडून प्रत्यक्ष करून घेत असे. येथे मध्यस्थ वापरला जात नसे. तत्कालीन सरंजामी प्रथेपासून शिवाजीराजांनी वेगळा मार्ग काढला होता. तशीच वेगळी रीत राजांनी सैन्याच्या बाबतही घालून दिली होती. मोगल बादशाहीत सरदारांकडे स्वतःचे सैनिक असत. आपल्या सरंजामातून सरदार सैनिकांचा पगार देत. सैनिक मध्यवर्ती सरकारचे परस्परनोकर नसत. शिवाजीराजांनी सरदारांना, म्हणजेच लष्करी अधिका-यांना, सरंजाम देणे बंद केले. ते त्यांना रोख पगार देत. पण सरदारांनी या पगारातून पैसे देऊन आपल्या पदरी सैनिक बाळगावेत, यालाही बंदी होती. सैनिकांचे पगारही मध्यवर्ती खजिन्यातूनच केले जात. त्यामुळे सैनिक हे अधिका-यांचे नोकर नसून राज्याचे नोकर बनून राहत. साहजिकच लष्करी अधिका-यांना किंवा सरदारांना स्वराज्याविरुद्ध बंड करण्याचे सामर्थ्य राहत नसे.

हा मध्ययुगाचा काळ हिंदुस्थानातच नव्हे तर जगभर सरंजामदारीचा काळ होता. ह्यातून बाहेर पडून आधुनिक युगात प्रवेश करण्याचा प्रयत्न शिवाजीराजांनी आपल्या परीने केला. ते वतनदारी संपू शकले नाहीत; पण त्यांनी वतनदारीवर कडक नियंत्रण ठेवले, करवसुली मक्त्याने न देता सरकारी अधिका-यांकरवी रयतेकडून परस्पर करण्यास सुरुवात केली. यावरून हे स्पष्ट होते की, शिवाजीराजे हे प्रगतिशील राज्यकर्ते होते. आणि राज्यकारभारात सुधारणा घडवून आणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. बहुतेक वेळा असे होते की, जी पद्धती पिढ्यान् पिढ्या चालत आलेली आहे, तिच्यात बदल केला तर काही धोके उद्भवतील या भीतीने राज्यकर्ते नवीन पावले उचलत नाहीत. पण राजांना ती खात्री होती की, आपण लोककल्याणाची कामे आणि लोककल्याणासाठी कारभार यांना महत्त्व दिले, तर हितसंबंधी सत्ता केंद्राच्या पलीकडे जाऊन रयतेचा पाठिंबा स्वतःसाठी मिळवू शकते.

(४)

आपण सध्याच्या समस्यांच्या संदर्भात शिवाजीराजांच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन करीत आहोत. आपण पाहिले की, कोणाही ऐतिहासिक व्यक्तीचे मूल्यमापन करताना तीन गोष्टींचा विचार करावा लागतो. पहिली म्हणजे निरनिराळ्या प्रसंगांत ती व्यक्ती किती

धडाडीने व चातुर्याने पुढे गेली. दुसरी म्हणजे त्या व्यक्तीने व्यवहारात आपल्या प्रतिभेचा कोणत्या प्रकारचा आविष्कार घडवला आणि तिसरी म्हणजे त्या व्यक्तीने कोणत्या प्रकारची मूल्ये आणि नीतिविवेक बाळगून काम केले. आपण पाहिलेच की, या सर्व बाबतींत शिवाजीराजे त्यांच्या काळाच्या संदर्भात कसोटीला पूर्णपणे उतरतात. आता सध्याच्या समस्यांच्या संदर्भात शिवाजीराजांचे हे गुण कशा प्रकारे उपयोगात आणता येतील, ते पाहू या.

आपण पाहिले की, सध्याच्या लोकशाही युगात सत्ता ही मतपेटीतून मिळणा-या विजयाने प्राप्त होत असते. मते गोळा करण्यासाठी तीन प्रकारचे मदतनीस लोकप्रतिनिधींना वापरावे लागतात. ते म्हणजे पक्षाचे कार्यकर्ते, मतदार संघातील बलदंड व्यक्ती आणि तिसरे म्हणजे धनत्तर उद्योगपती किंवा इतर मार्गाने श्रीमंत झालेल्या व्यक्ती. या तिन्ही प्रकारच्या व्यक्ती लोकप्रतिनिधींवर कुरघोडी करू शकतात. त्यांना नियंत्रणात ठेवणे आवश्यक असते. तसे ठेवले नाही तर ही निराळी सत्तास्थाने निर्माण होऊन ती लोकप्रतिनिधींना वाकवू शकतात. तीच गोष्ट लोकानुनय आणि लोकशिक्षण यांच्या बाबतीत आहे. लोकप्रतिनिधी जर जनतेशी प्रत्यक्ष संबंध ठेवून असेल, तर तो लोकांच्या मर्जीखातर त्यांना पाहिजे त्या गोष्टी न देता त्यांच्या हिताच्या गोष्टी त्यांना समजावून सांगू शकतो. थोडक्यात काय की, लोकप्रतिनिधी आणि लोक यांच्यात मध्यस्थी करणा-या सत्तास्थानांना बाजूला सारले पाहिजे. राजांनी वतनदारीला चाप लावून आणि सरंजामशाही संपवून प्रजेशी प्रत्यक्ष संवाद राखला होता. त्यामुळे प्रजेच्या पाठिंब्याचा त्यांना विश्वास वाटत होता.

आपण पाहिले की, बादशाह्या आपल्या प्रजेपैकी मोठ्या समुदायाला आपला शत्रू मानून राज्य करताना जुलमाचा आणि दडपशाहीचा वापर करीत. त्यांच्या विरुद्ध वारंवार बंडे होत. स्वराज्यात राजांनी सा-या प्रजेला एकाच पद्धतीने वागविले व न्याय दिला. त्यामुळे स्वराज्यावर परकीयांची आक्रमणे झाली, तरी जनता त्या परकीयांच्या अधीन झाली नाही. परिस्थिती पालटल्यावर पुन्हा ते प्रदेश स्वराज्यात आले. आणि शिवाजीराजांच्या मृत्यूनंतरही स्वराज्यातील प्रजेने परकीय आक्रमणाला तोंड दिले. सध्याच्या लोकशाही राज्यात औपचारिक दृष्टीने जरी लोकप्रतिनिधींकरवी राज्य चालत असले, तरी आपणास असा अनुभव येतो की, निर्वाचित प्रतिनिधी आपल्या मतदारांमध्ये भेदाभेद करतात. आणि त्यातून कडवटपणा निर्माण होतो. हा कडवटपणा निर्माण होण्यात लोकप्रतिनिधी आणि मतदार यांच्यात जी दलालांची साखळी असते, तिचाही मोठा भाग असतो. राजांपासून जर काही आपल्याला शिकायचे असेल तर हेच की, आपली सत्ता राखण्यासाठी प्रजेत दुफळी माजवणे, काही समुदायांना दूर लोटणे, तर काहींवर कृपेची खैरात करणे हे मार्ग शेवटी -हासाकडे नेणारे आहेत.

शिवाजीराजांचे चारित्र्य फार वरच्या दर्जाचे होते. आणि त्यांची दृष्टी अतिशय विस्तृत होती. स्वतःच्या प्रजेला नाडून किंवा तिच्यावर अवाजवी कर लादून सरकारी खजिना भरणे हे त्यांना पसंत नसे. त्या काळच्या रीतीला धरून पैसे मिळविण्यासाठी परराज्यातील श्रीमंत शहरांची त्यांनी लूट केली, हे आपल्याला माहीत आहे. त्या काळी तसे वागणे गैर मानले जात नव्हते. आता परिस्थिती बदलली आहे. अगदी दुस-या देशाशी लढाई झाली, तरी तेथून संपत्ती लुटून आणणे शक्य राहिलेले नाही. त्यावर उपाय म्हणजे आपल्या देशात उत्पादन वाढवून व ते परदेशांना विकून आपल्याकडील संपत्ती वाढवणे हा होय. हा मार्ग अवलंबतानादेखील अनेक पथ्ये पाळावी लागतात, हे उघडच आहे. छत्रपतींनी स्वराज्यातील रयतेला नाना प्रकारे उत्तेजन देऊन व पिकांची निगा राखण्याचे आदेश आपल्या अधिका-यांना देऊन स्वराज्यांतर्गत उत्पन्न वाढवण्याचा प्रयत्न केलाच; पण त्याच वेळी व्यापारालादेखील उत्तेजन दिले. इंग्रज, डच, फ्रेंच अशा परकीय व्यापा-यांच्या वखारींना त्यांनी कधीच त्रास दिला नाही. मात्र त्याच वेळी त्यांच्याकडून नियमांना धरूनच व्यापार केला जाईल, त्याची दक्षता घेतली.

(५)

आपण पाहिले आहे की, सरंजामदारीच्या काळातील मनोवृत्ती, समाजाची मनोरचना, त्या काळातील रीतिरिवाज हे सगळे लक्षात घेऊन त्यातून जमेल तितकी

अनुक्रमणिका

सुटका मिळवून राजांनी लोकांच्या पाठिंब्यावर चालणारी एक राजसत्ता उभी केली. या राजसत्तेचे वैशिष्ट्य होते की, सत्ता आणि प्रजानन यांच्या दरम्यान सरंजामशाही पद्धतीत निरनिराळ्या सत्ताकेंद्रांचे जे स्तर असत, ते राजांनी नाहीसे केले व त्या काळाला साजेल असे एक लोकराज्य निर्माण केले.

आज आपण लोकशाही राज्यपद्धतीत आहोत. हे लोकांचे, लोकांनी लोकांसाठी चालवलेले राज्य आहे, असे आपण मानतो. तरीही कारभाराच्या सोयीसाठी म्हणा किंवा अजूनही आपला समाज सरंजामी वृत्तीतून पुरेसा बाहेर आलेला नाही म्हणून म्हणा, किंवा लोकशिक्षणात आपले नेते कमी पडले आणि लोकरंजनाचा सोपा मार्ग त्यांनी स्वीकारला यामुळे म्हणा; आपण सरकार आणि प्रजा यांच्या दरम्यानची विविध सत्ताकेंद्रे नाहीशी करू शकलो नाही. राजांच्या कारभारापासून आपण इतका धडा घेतला तरी तो देशाला उन्नतीच्या आणि भरभराटीच्या उच्च स्तरावर नेऊन पोचवील.

ཅཅཅ

# शेतक-यांच्या आत्महत्यांची कारणमीमांसा

बाबूराव चंदावार

**प्रस्तावना**

शेतक-यांच्या आत्महत्या देशात सर्वत्र होत आहेत. त्या होतच राहतील असेच कदाचित गृहीत धरले गेले असावे, असेही वाटते! कारण, या आत्महत्यांची जी काही कारणे अनेक पर्यांनी सांगितली जात आहेत, ती लक्षात घेऊन आत्महत्या थांबवण्यासाठी काही परिणामकारक उपाययोजना केली जात असावी, असे सकृत्दर्शनी तरी दिसून येत नाही. अर्थात, आत्महत्या थांबवण्याचे प्रयत्न होतच नाहीत असेही म्हणता येत नाही! पण जे प्रयत्न केले गेले अथवा केले जात आहेत, त्यांत आत्महत्या होऊच नयेत याची हवी तशी व तेवढी खबरदारीची जाणीव दिसून येत नाही. म्हणजे आत्महत्या होऊच नयेत असे जरी वाटत असले, तरी ज्या कारणांसाठी आत्महत्या होत आहेत, ती कारणे जाणून घेण्यासाठी ज्या आवश्यक दृष्टीची गरज असते, तिचाच अभाव झालेला असावा, असे जाणवत राहते! कारण, आत्महत्येचा प्रश्न हा मुळात राष्ट्रीय नियोजनातल्या दृष्टिदोषातून निर्माण झालेला असावा, असे वाटण्यासारखी परिस्थिती आहे! असे असूनसुद्धा त्याकडे दुर्लक्ष केले जात असावे, असे साधार म्हणता येऊ शकते.

**१. कारणमीमांसा करायला हवी**

देशात सर्वाधिक प्रमाणात आत्महत्या महाराष्ट्र राज्यात झाल्या व होत आहेत, असे म्हटले जातेच आहे! महाराष्ट्र राज्यात गेल्या वर्षात तीन हजार दोनशे अठ्ठावीस शेतक-यांनी आत्महत्या केल्याचे केन्द्रीय कृषिमंत्र्यांनी सांगितले आहे. यांतील एक हजार एकशे नऊ आत्महत्या एकट्या मराठवाड्यातील आहेत. अलीकडे म्हणजे गेल्या दोन महिन्यांत एकशेचोवीस शेतक-यांनी आत्महत्या केल्या आहेत. शेतकरी आत्महत्या का करीत आहेत, हे जाणून घेण्याची गरज ना नव्या महाराष्ट्रातल्या शासनकर्त्यांना वाटली ना यंत्रणेला. (एका मराठी संपादकीयाच्या ७ मार्च २०१६ च्या आधारे.) महाराष्ट्रातले शासनकर्ते व यंत्रणा याला निराधार आक्षेप मानून त्याचे खंडनही करतात. म्हणून, आत्महत्येच्या वस्तुस्थितीकडे व एकूणच त्या परिस्थितीकडे कोणत्या दृष्टीने पाहायला हवे, असा एक प्रश्न उपस्थित झाला आहे. यावर साधार विचार करायला हवा.

जगण्याची तीव्र इच्छा असूनही त्यासाठी हवे असते ते आश्वासन मिळण्याची शक्यता जेव्हा संपुष्टात येत असते किंवा संपुष्टात आलेलीच असते, तेव्हा अशा आश्वासनाअभावी माणसाला जगावेसे वाटत नाही, हे खरे आत्महत्येचे कारण आहे. तेव्हा राजकीय, आर्थिक व सामाजिक परिस्थिती माणसाला संकटसमयी जगण्याची उभारी देणारी असावी, हेच यातून अपेक्षित आहे.

म्हणून, परिस्थितीत आश्वासक परिवर्तन घडवून आणण्याचा प्रश्न दुर्लक्षित करून जर राजकीय, आर्थिक व सामाजिक परिस्थिती निर्माण करण्याचे अथवा घडवण्याचे प्रयत्न जर निष्फळ होत असतील, तर यातून जगण्याची प्रेरणा संपुष्टात येणे स्वाभाविकच म्हणायला हवे! या दृष्टीने विचार करता लक्षात येईल की, राजकीय, आर्थिक व सामाजिक रचनेची प्रेरणाच मानवीय मूल्यांवर आधारित असावयाला हवी. पण, आत्महत्यांच्या कारणांचा विचार करताना राजकारणातून आलेल्या अमानुष सत्ताकांक्षेच्या, आर्थिक व सामाजिक विषमतेच्या जाचातून होत असलेल्या शोषणाचा कितपत व कसा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध असतो यावर विचारच केला जात नाही. तेव्हा, आत्महत्यांवर विचार करताना जे आजवर अनेकानेक व सर्व त-हेच्या प्रसारणांच्या माध्यमातून जनमानसावर बिंबवले गेले आहे, त्यातून मानवीय मूल्यांची अवहेलना राजकारणातून, आर्थिक व सामाजिक परिस्थितीतून कशी होत आहे, याचे प्रभावी प्रस्तुतीकरण होऊ शकलेले नाही. तेव्हा, याचा संदर्भ ज्या ग्रामीण जीवनाशी निगडित आहे किंवा ग्रामीण

परिस्थितीतूनच जे प्रश्न उपस्थित होऊ शकलेले आहेत, त्यांचाच प्रामुख्याने विचार करायला हवा. पण, याकडे दुर्लक्ष करून फक्त शेतक-यांच्या आत्महत्या थांबायला हव्यात, एवढेच म्हटले जाते आहे! अर्थात, यावर विचार करताना लक्षात घ्यायला हवे की, ग्रामीण प्रश्न अथवा खेड्यांचे प्रश्न मनुष्यसंस्कृतीच्या अस्तित्वाशी निगडित आहेत. कारण, भारतापुरता विचार केला तरीही मनुष्यसंस्कृती खेड्यांतूनच अस्तित्वात आली आहे हे जाणून घेऊनच शेतक-यांच्या आत्महत्यांच्या कारणांची मीमांसा करता येऊ शकेल. अर्थातच ही मीमांसा करायला हवी!

## २. औद्योगिकीकरणाला विकासाचे गमक का मानायचे?

भारत जरी स्वतंत्र झालेला असला, तरी खेडी स्वतंत्र झालेली नाहीत, ही एक वस्तुस्थिती आहे! म्हणून विनोबांनी भारताच्या स्वातंत्र्याविषयी 'गुलाम खेड्यांचा स्वतंत्र देश' असे का म्हटले असावे ते जाणून घ्यायला हवे. स्वातंत्र्यात भारताचा कसा विकास व्हावा, हा प्रश्न ज्यांना पडलेला होता, त्यांना खेड्यांचा विकास हाच भारताचा विकास आहे, असे उत्तर महात्मा गांधींनी दिले होते. म्हणून त्यांनी स्वराज्य हे ग्रामस्वराज्यात परिवर्तित व्हावे, अशी अपेक्षाही केली होती. पण, या दिशेने जाण्यासाठी जी भक्कम भूमिका घ्यायला हवी होती, ती मात्र घेतली गेली नाही. कारण, स्वतंत्र भारताचा विकास म्हणजे औद्योगिकीकरणातून होणारा विकास असाच अर्थ औद्योगिकीकरणाच्या समर्थकांनी लावला व औद्योगिकीकरण झाल्यासच स्वतंत्र भारताचा विकास झाला, असे म्हटले जाईल, असा निर्वाळा दिला जाऊ लागला! औद्योगिकीकरण म्हणजे म्हणजे नेमके काय, याचा खुलासा मात्र व्हावयाला हवा होता. पण तो खुलासा अद्याप झालेलाच नाही! म्हणून, औद्योगिकीकरण म्हणजे औद्योगिक वसाहतीकरण असाच याचा अर्थ लावून औद्योगिकीकरणातून स्वाभाविकपणेच होऊ शकणा-या शहरीकरणाची वा नागरीकरणाची कास धरली गेली! पण, ही शहरीकरणाची वा नागरीकरणाची निर्मिती खेड्यांच्या भवितव्याचा विचार न करताच केली गेली. म्हणून, खेड्यांच्या स्वतंत्र अस्तित्वावर आक्रमण करूनच शहरीकरण वा नागरीकरण केले जाऊ लागले. म्हणून ज्या खेड्यांना मनुष्यसंस्कृतीचे उगमस्थान मानले गेले आहे, ते स्थान भ्रष्ट करून अथवा नाहीसे करूनच शहरीकरणाला अथवा नागरीकरणाला उत्तेजन दिले गेले. यामुळे मनुष्यसंस्कृतीच्या विकासाला व संवर्धनालाही शहरीकरणाच्या वा नागरीकरणाच्या उपक्रमशीलतेमुळे आळा बसला गेला व मनुष्यसंस्कृतीच्या विनाशास यातून प्रारंभही केला गेला. पण, यामुळे मनुष्य-संस्कृतीच्या विनाशाची प्रक्रियाही सुरू ठेवली गेली, याचे भान मात्र ठेवता आलेले नाही! कारण, शहरीकरण अथवा नागरीकरण हे जरी प्रगती अथवा विकासाचेच मानले गेले असले, तरी शहरीकरणातून वा नागरीकरणातून मनुष्यसंस्कृतीचे रक्षण-संवर्धन होणे शक्य नव्हते, याची जाणीव विकासाच्या संकल्पनेतून संपूर्णपणे निसटूनच गेली आहे! शहरांतून किंवा नगर-महानगरांतून वाढत गेलेली गुन्हेगारी–जी आता असह्य झालेलीच दिसते आहे, ती संस्कृतिविनाशाच्या दुष्परिणामातूनच झाली आहे. हे म्हणणे औद्योगिकीकरणाच्या आस्थेवाईक-समर्थकांनाही हे नाकारता येत नाही. तेव्हा, खेड्याच्या विघटनप्रक्रियेतून कृषिक्षेत्राचे औद्योगिकीकरणाच्या स्वाभाविक परिणामातून जे शोषण झाले, त्यातूनच जर मनुष्यसंस्कृतीच्या विनाशाची बीजे पेरली व रुजवली गेली असतील, तर औद्योगिकीकरण हे विकास अथवा प्रगतीचे गमक का मानायचे, असा प्रश्न सहजच उपस्थित होतो!

## ३: स्वातंत्र्याला आव्हान देणारा विद्रोह

खेड्यांचे अस्तित्व शेती आणि शेतकरी-शेतमजूर या वस्तुस्थितीतून अस्तित्वात आलेले आहे. अर्थात, शेतीवर शेतकरी-शेतमजूर व शेतकरी-शेतमजुरांवर शेती अवलंबून असतात. यात शेतकरी-शेतमजूर व शेती यांमधले संबंध हे बाजारू स्वरूपाचे म्हणजे नफा-तोट्याच्या कृत्रिम व्यवहारातले कधीच नव्हते. कारण, शेतकरी-शेतमजुरांच्या श्रमातून शेतीतून शेतक-यांच्या व त्यावर अवलंबून असणा-यांच्या गरजा भागवण्याचेच उत्पादन होत आले. म्हणून, परस्परांच्या गरजांची पूर्तता करणे महत्त्वाचे मानून जेव्हा शेती केली जात असे, तेव्हा त्यातून बाजारू नफा-तोट्याचा स्पर्श होतच नसायचा!








पण, गरजा बाजूला पडून शेतक-यांच्या जीवनात भोगवासनेला प्राधान्य मिळण्याच्या परिस्थितीतून बाजार-नफा-तोट्याला महत्त्व आले. म्हणून, शेतीतले उत्पादन गरजा पूर्ण करण्यासाठी न करता भोगवासनेला तृप्त करण्यासाठीच जेव्हा होऊ लागले, तेव्हा त्यातून नफा-तोट्याचा बाजार अस्तित्वात आला. या बाजारानेच शेतीउत्पादनाच्या उद्दिष्टांत भोगवासनेला प्राधान्य देण्याच्या उत्पादनांना व उत्पादनपद्धतीला उत्तेजन दिले! पण, नफा–तोट्याचा बाजार शेतक-यांच्या नियंत्रणात असणे शक्य झाले नाही! म्हणून, नफा–तोट्याचा विचार करणा-या व तशी प्रवृत्ती यशस्वीपणे जोपासणा-या दलाल-व्यापा-यांकडे बाजाराचे नियंत्रण जाणे स्वाभाविकच होऊन बसले ! म्हणून, शेती व शेतकरी-शेतमजूर बाजारू उत्पादनपद्धतीत अडकून पडले व ते बाजार व दलाल-व्यापा-यांच्या नियंत्रणात जाऊन पोचले. या परावलंबनाच्या स्थितीतून औद्योगिकीकरणाला अनुकूलता निर्माण केली गेली. यामुळेच औद्योगिकीकरणाच्या नियंत्रणात कृषिक्षेत्र व या क्षेत्रातली खेडी जाऊ शकली व औद्योगीकीकरणाच्या अनियंत्रित यांत्रिकीकरणातूनच शेतक-यांचे, शेतीचे व खेड्यांचेही शोषण होऊ लागले. हे या वेळी अनियंत्रित अवस्थेतच असल्यामुळे खेड्यांच्या शेतीवर दुष्परिणाम झाला व शेतीच्या उत्पादनातूनच अस्तित्वात आलेले शेतीजीवनाला साहाय्यक व पूरक असणारे ग्रामीण उद्योग संपुष्टात येऊ लागले. ते इतक्या प्रमाणात संपुष्टात आले की, शेतीउत्पादनाच्या बाजारू शोषणातून जसे शेती-शेतकरीजीवनाला स्वावलंबी राहता येऊ शकले नाही, तसेच ग्रामीण उद्योगही खेड्यात अस्तित्वात राहू शकले नाहीत! यातूनच ग्रामीण बेरोजगारी बेसुमार वाढली व रोजगाराच्या शोधात निघालेला खेड्यातला माणूस शहर व नगर-महानगरांकडे जाण्यास खेड्यातून पलायन करू लागला. अशा त-हेने खेड्यातल्या शेती व ग्रामीण उद्योगांच्या दुर्दशेतूनच खेडी ओस पडू लागली व नगर-महानगरांतल्या लोकसंख्येचा कृत्रिम व रोगट फुगवटा होत गेला. शेती व ग्रामीण उद्योग संकटात सापडल्यामुळे व हे संकट औद्योगिकीकरणाच्या अनियंत्रित यांत्रिक स्वरूपातूनच निर्माण झालेले असल्यामुळे शेती, शेतकरी व ग्रामीण उद्योग हे सर्वच ज्या खेड्यांत अस्तित्वात होते, त्या खेड्यांचे अस्तित्वच नाहीसे होण्याची परिस्थिती निर्माण झाली. यातूनच कृषिप्रधान ग्रामीण व्यवस्था कोलमडून पडली आहे. शेतमालाला न्यायोचित मूल्य मिळणे शक्य होणारच नसल्यामुळे शेतीची कसणूक करून शेतीमालांचे उत्पादन करणे अशक्य झाले असून न परवडणारी शेती करणे कोणत्याच शेतक-याला यापुढे शक्य होणार नाही! याचा अपरिहार्य परिणाम असा होईल. की शेती औद्योगिक प्रतिष्ठानांच्या नियंत्रणात व संचालनात जाईल. यामुळे औद्योगिकीकरणाला पूरक-प्रेरक अशीच शेती करणे शक्य होऊ शकेल. ही शेती अर्थातच खेड्यातल्या कोणत्याही शेतक-यांची असूच शकणार नाही. अशा त-हेने खेड्यातल्या शेतकरीजीवनाचे शोषण करूनच औद्योगिक प्रतिष्ठाने समृद्ध होऊ शकतील व ती समृद्ध होतही आहेत! म्हणून शेतकरी-आत्महत्यांच्या कारणांचा शोध घेताना ज्या निष्कर्षाप्रत जाणे शक्य होईल, तो निष्कर्ष अनियंत्रित औद्योगिकीकरणाच्या यांत्रिक दुष्परिणामापर्यंत नेऊन पोचवणाराच आहे. अर्थात, हे कोणत्याही परिस्थितीत लक्षात घ्यावे लागणारच आहे! पण, हे लक्षात घेण्याचे टाळले जाते आहे. कारण, औद्योगिकीकरणातूनच रोजगारनिर्मिती केली जाऊ शकते, अशा एका भ्रमात सध्या याचे समर्थक वा आस्थेवाईक आहेत. शेतीच्या उत्पादनातून अनेक त-हेचे प्रक्रियाउद्योग निर्माण होत असतात याकडे दुर्लक्ष करूनच अशा त-हेचा भ्रम पाळला जातो आहे. पण, या भ्रमात कोणालाही फार काळ राहता येणार नाही. कारण, खेड्यांचे अस्तित्व नाहीसे करण्यातून व नगर-महानगरांतल्या वाढत्या रोगट लोकसंख्येची जाचक परिस्थिती जो एक विद्रोही विस्फोट घडवून आणील, तो नुसताच प्रचलित कायदा व सुव्यवस्थेला आव्हान देणारा असणार नाही; एकूणच राष्ट्रीय स्वातंत्र्याला आव्हान देणाराही तो असू शकेल!

**४: ग्रामीण जीवन सुरक्षित-संवर्धित करण्याची गरज**

सध्या कायदा व सुव्यवस्था अनेक कारणांमुळे संकटात सापडल्याचे दिसते आहे. कारण, औद्योगिकीकरणातून जे नागरीकरण होते आहे, ते गुन्हेगारी प्रवृत्तीला उत्तेजन देणारे व गुन्हेगारी वाढवणारेच असू शकते. अर्थात, अनियंत्रित औद्योगिकीकरणातून औद्योगिक

नागरी सभ्यता (सिविलायजेशन) अस्तित्वात आणण्याचा हा प्रयत्न असल्यामुळे ब्रिटिश शासनाच्या काळात जे 'सिविल लाइन्स' निर्माण केले गेले, तशाच शासन यंत्रणा चालवणा-या अधिकारी व कर्मचा-यांचे तसेच त्यांच्या नियंत्रणातल्या व आश्रयानेच जगणा-या उच्चभ्रू वर्गाच्या वसाहतीही निर्माण केल्या जातील. नगर-महानगरांतून अशा वसाहती निर्माण होताना दिसतेही आहे! कारण, खेड्यांतून पलायन करून आलेल्या लोकांना नगर-महानगरांत सामावून घेण्यासाठी झोपडपट्ट्या निर्माण व्हाव्याच लागतात व त्या निर्माण झालेल्याही आहेत. पण, झोपडपट्टीवासीयांचीच संख्या नगर-महानगरांत सर्वांत मोठी होत जाईल. मुंबई-पुण्यासारख्या किंवा दिल्ली-कोलकात्यासारख्या महानगरात यांची संख्या ज्या प्रमाणत वाढलेली दिसते आहे, त्यातून प्राथमिक गरजा पुरवण्याची क्षमता कोणत्याच महानगराच्या संयोजनात असू शकणार नाही. म्हणून, 'स्मार्ट सिटी'चे गाजर दाखवून महानगरांतल्या वाढत्या गुन्हेगारीला नियंत्रणात ठेवण्याचे मनसुबे रचले जात आहेत. पण, याचा फारसा उपयोग होण्याची शक्यता नाही. कारण, महानगरांतली वाढती गुन्हेगारी 'स्मार्ट सिटी' सारख्या तकलादू व भ्रामक योजना यशस्वी होऊच देणार नाही. (लॉ एण्ड ऑर्डर.) तेव्हा, खेडी नष्ट करून औद्योगिक प्रतिष्ठानांच्या नियंत्रणात शेती देण्याच्या कळत-नकळत प्रयत्नातून जी नगर-महानगरांची वाढत जाणारी रोगट लोकसंख्या गुन्हेगारांच्या वसाहतीतच परिवर्तित होणार असेल, तर संसदीय लोकशाहीची व्यवस्था संपूर्णपणे सैनिकी सत्तेच्या नियंत्रणातच जाण्याची शक्यता कोणालाच नाकारता येणार नाही! म्हणून, नक्सली-माओवादी चळवळी भारताच्या राज्यघटनेलाच आव्हान देण्याचे ठरवून जो हिंसाचार घडवीत आहेत, तो एक संसदीय लोकशाहीला पर्याय देण्याच्या उद्देशाने पुढे रेटण्याचा प्रयत्न नक्सली-माओवाद्यांचा असल्यामुळे, खेड्यांच्या अस्तित्वालाच आव्हान उभे करण्याच्या औद्योगिकीकरणाच्या रचनेतून निर्माण होत असलेल्या असंतोषाचा लाभ नक्सली-माओवादाला अवश्य मिळू शकेल, हे वेळीच लक्षात घ्यायला हवे! यातून निर्माण होणारी परिस्थिती या देशाला सैनिकीकरणाकडेच नेणारी होऊ शकेल! तसेच नक्सली-माओवादाच्या भारतीय राज्यघटनेच्या विरोधाच्या भूमिकेलाही याचा लाभ मिळू शकेल. या सर्व शक्यता लक्षात घेऊनच ग्रामीण लोकजीवन सुरक्षित व संवर्धित करण्याचा प्रामाणिक प्रयत्न व्हावयाला हवा!

**उपसंहार**

तात्पर्य असे की, शेतक-यांच्या आत्महत्यांचा विचार करताना लक्षात घ्यायला हवे की, भारतीय लोकजीवन ज्या ग्रामीणांच्या खेड्यांतून अस्तित्वात आले आहे, त्यातल्या मनुष्यसंस्कृतीची बीजे नष्ट करून भारताचे स्वातंत्र्य टिकवून धरता येणार नाही! म्हणून, स्वराज्याला ग्रामस्वराज्याकडेच वळवायला हवे आहे. अर्थात, याची निकड वाटायला हवी! पण, शेतक-यांच्या वाढत्या आत्महत्या लक्षात घेता याकडे दुर्लक्ष केले जाते आहे,

ଓଓଓ

अनुक्रमणिका






# परिभाषेचा प्रपंच*

सदाशिव आठवले

### परिभाषेचा प्रश्न

एका विद्वान अर्थशास्त्रज्ञांबरोबर त्यांच्याच विषयावरील लेखनासंबंधी चर्चा करीत असता मी सहजगत्या उच्चारलेला 'आयुर्विमा' हा शब्द त्यांना खटकला. तो शब्द काही मी तयार केलेला नाही. मध्यवर्ती सरकारचा तो शब्द आहे आणि तो भारतभर लोकमान्य झाला आहे, हे मी त्यांच्या नजरेस आणले. पण तो शब्द मुळात कुणाचाही असला, तरी तो मी वापरणे त्यांना मान्य नव्हते. ते स्वतः तो कधीही वापरणार नाहीत. कारण तो शब्द म्हणजे 'आयुः' हा संस्कृत शब्द आणि 'विमा' हा फारसी शब्द ह्यांचा समास आहे. असा भाषिक वर्णसंकर त्यांना पटत नाही. मी काही बोललो नाही; पण मला चटकन 'अक्कलशून्य' हा शब्द आठवला. त्या विद्वानासाठी म्हणून नव्हे, तर तो 'अक्कलशून्य' शब्दही असाच एक मिश्रविवाह आहे म्हणून. त्याच्या पाठोपाठ 'धनदौलत', 'फळबाजार' असे कितीतरी शब्द मला आठवू लागले. 'मुलगा पास झाला', यातला 'पास' शब्द इंग्रजीतून घेतला आणि संस्कृत किंवा मराठी 'ना' लावून चक्क 'नापास' शब्द आपण तयार करून 'मुलगी नापास झाली', असे म्हणू लागलोच की!

सर्व शास्त्रे आणि कला आता मराठीतून सांगावयाच्या आहेत, मराठीतून शिकावयाच्या आहेत. सर्व विषयांवर मराठीत लिहावयाचे आहे, लिहावेच लागणार आहे. खगोलशास्त्र, सूक्ष्मजीवशास्त्र, गणित इत्यादी शास्त्रांचे विवरण मराठीत करावयाचे आहे. चित्र, संगीत वगैरे कलांच्या क्षेत्रांतही प्रत्यही बदलणाऱ्या निरनिराळ्या कल्पना मायबोलीतून सांगावयाच्या आहेत. आमचे विद्वान ह्या सर्व गोष्टी इंग्रजीतून शिकले आहेत. पुढच्या पिढ्यांनाही इंग्रजी शिकावेच लागणार आहे. पण मराठीतूनच मिळेल तितके जास्तीत जास्त प्रगल्भ असे ज्ञान घेऊन नंतरच आवश्यकतेप्रमाणे त्यांना इंग्रजीकडे धाव घ्यावी लागावी अशा तऱ्हेच्या योजना आखून सर्व विषयांतील ज्ञान अधिकांत अधिक प्रमाणात मराठीत उतरवावयाचे आहे. इंग्रजी शिकून शहाणे झालेले मागच्या पिढ्यांतील विद्वान हे काम करू शकतील, ह्याबद्दल शंका नको. मराठीतून निरनिराळे विषय मांडण्याचे प्रयत्न काही नवीन नाहीत. अगदी अव्वल इंग्रजीपासून त्यांची परंपरा दाखविता येईल. अत्यंत कौतुकास्पद आणि अभिनंदनीय अशा अनेक उपक्रमांचा उल्लेख करता येईल. पण तूर्त तो विषय नाही. आजची विशेष गरज अशी की, ज्ञानेच्छू बहुजनसमाजाच्या हाकेला ओ देण्यासाठी आता तोच प्रयत्न एकदमच सर्व शास्त्रकलांसाठी फार मोठ्या प्रमाणावर करण्याची गरज निर्माण झाली आहे.

आणि म्हणूनच परिभाषेचा प्रश्न पुढे ठाकला आहे. सर्व विषयांतले सखोल ज्ञान मराठीत सांगावयाचे तर ते कुठल्या शब्दांत? आपल्या भाषेत शब्दच कुठे आहेत? नवीन घ्यायचे तर मग ते कसे? त्याबाबत काही मार्गदर्शक अशी तत्त्वे आहेत का? काही पथ्ये, काही विधिनिषेध ठरले आहेत काय? ठरवता येतील काय?

### शुद्धतेच्या पोरकट कल्पना

परिभाषेच्या वापरात कोणते विचार यावेत हे पहाण्यापूर्वी, मला वाटते, कोणते विचार येऊ नयेत हे सांगणे अधिक निकडीचे झाले आहे.

वर उल्लेखिलेल्या अर्थशास्त्रज्ञांप्रमाणे कित्येक विद्वान शब्दाच्या शुद्धतेविषयी फार आग्रही असलेले दिसतात. शुद्धतेची ही कल्पना काहीशी बालिश आणि काहीशी भ्रामक आहे. जगातली अशी एकही भाषा दाखविता येणार नाही की, जिच्यातले सगळे शब्द

* ***नवभारत*** एप्रिल १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.





संपूर्णतया स्वकीय आहेत. व्याकरण आणि वाक्यरचना वगैरेंच्या सर्व नियमांसह आणि वीस-पंचवीस लाख शब्दसंपत्तीसह एके दिवशी सकाळी एक भाषा जन्मास आली, असे कधी होत नाही. प्रत्येक भाषा इतर अनेक भाषांतून शेकडो शब्द घेत असते. ते शब्द कधी जसेच्या तसे घेतले जातात, कधी बदलून, आपल्याला नीट उच्चारता येतील अशा त-हेने ठाकठीक करून घेतले जातात. इंग्रजी 'टिकेट'चे मराठी 'तिकीट' होते. परकीयांची विशेष नावेसुद्धा आपल्या सोईसाठी आपण बदलून घेतो. आपण 'कन्नड'ला 'कानडी' म्हणतो, 'गुजरात'ला 'गुजराथ' म्हणतो. पेशव्यांनी 'हेस्टिंग्स' आणि 'अँडरसेन' ह्या इंग्रजांस अनुक्रमे 'इष्टिन (ण)' आणि 'इंद्रसेन' बनविले होते. आपल्या विशेष नावांचे इंग्रजादी लोकांनी काय केले ते अजून आपल्याला अवतीभोवती दिसतेच आहे. इंग्रजांनी 'शीव'चे 'सायन' केले आणि आता कदाचित् अनेक मुंबईकरांना (की 'बॉंबे'करांना!) 'सायन' हे चूक आहे आणि 'शीव' हे बरोबर आहे, हे पटायचेही नाही. 'डॉक्टर', 'मोटार', 'एंजिन', 'ड्रायव्हर', 'कॉलेज' असे शेकडो इंग्रजी शब्द सध्या मराठीत आपण ते अगदी आपले असल्यासारखे वापरतो. पूर्वी असेच कानडी, फारशी, उर्दू, अरबी वगैरे भाषांतील हजारो शब्द मराठीने घेऊन पचविले आहेत. बरे, शुद्धीकरणाविषयी जेव्हा अनेकदा बोलण्यात येते, तेव्हा शुद्धीकरण म्हणजे संस्कृतीकरण असाच अर्थ अभिप्रेत असतो. मग तसे पाहिले तर, संस्कृत ही परकीच का समजू नये? आक्रमक आर्यांनीच ती भारतात आणली ना? ते आक्रमण फार पूर्वी झाले एवढेच काय ते! एका परकी भाषेतले रूढ झालेले शब्द फेकून दुस-या परकी भाषेतले घेण्यात आपण काय साधतो? तथापि असे प्रयत्न झाले हे खरे. परंतु मराठेशाहीत 'पेशवा' ह्या यावनी शब्दाऐवजी 'पंतप्रधान' असा संस्कृत शब्द बसवण्याचा मुद्दाम प्रयत्न करूनही शेवटी 'पेशवा' हाच शब्द जनमनात ठसला. अलीकडच्या काळातही अशा शपथपूर्वक शुद्धीकरणाचे प्रयत्न झाले व होत आहेत. 'हजर' होण्याऐवजी आम्ही 'उपस्थित' होऊ लागलो आणि 'गैरहजर' न रहाता 'अनुपस्थित' होऊ लागलो. परंतु हा सगळा खटाटोप कशासाठी? विचारांची आणि भावनांची देवघेव हे भाषेचे प्रयोजन. ते ज्या शब्दांनी उत्तम साधते ती त्या भाषिकांची शब्दसंपत्ती. ह्यात आपले शब्द आणि परकी शब्द; शुद्ध आणि अशुद्ध शब्द वगैरे कल्पना याव्यात तरी कशाला?

**इंग्रजी शब्दांचे स्थान**

निरनिराळ्या शास्त्रीय, कलाविषयक आणि साहित्यविषयक विचारांतील परिषाषेसंबंधी पहिली गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे ती ही की, इंग्रजीसंबंधीचा आपला दूषित ग्रह सोडून देणे आवश्यक आहे. सर्व नवे ज्ञानच जर इंग्रजीद्वारा मराठीत येत आहे, तर ते कमी-अधिक प्रमाणात त्या त्या परिभाषेसकटच येणार, हे स्पष्ट आहे. आणि जर कल्पना आणि विचारही नवीन आहेत आणि शब्दही नवीनच आहेत, तर त्या विचार-कल्पनांबरोबर ते शब्दही येणे अपरिहार्यच नव्हे, तर अनेकदा इष्टही म्हटले पाहिजे. कोणतेतरी अपरिचित शब्दच निवडावयाचे असतील तर, अपरिचित संस्कृत शब्दांपेक्षा अपरिचित इंग्रजी शब्द निश्चितच चांगले. कारण तशा अनेक शब्दांशी चांगला परिचय झालेल्या विद्यार्थ्याला अधिक सूक्ष्म ज्ञानासाठी त्या त्या विषयातील इंग्रजी ग्रंथांकडे वळणे आणि त्यांचा उपयोग करणे अधिक सुलभ होईल. 'इंजिनियर', 'क्लार्क' वगैरेंसारखे शब्द तर आता मराठी माणसाला इतके चांगले ठाऊक आहेत की, त्यासाठी वेगळे मराठी म्हणजे संस्कृत प्रतिशब्द तयार करण्याचे कारण का वाटावे, तेच समजण्यासारखे नाही. आधीच पुष्कळ परिचित असलेल्या आणि खेडुतालाही सहज समजू शकणा-या रूढ इंग्रजी शब्दांऐवजी भारतीय म्हणजे संस्कृत शब्द निर्माण करण्याच्या उद्योगातून आपण कुठे जातो, ह्याचे एकच उदाहरण देतो. एखाद्या लहानशा खेडेगावाला वीजपुरवठा मिळाला, की तिथला महादू पाटील आपल्या ओळखीच्या एखाद्या 'फिटर'ला बोलावतो आणि घरभर विजेचे (किंवा 'इजेचं') 'फिटिंग' करून घेतो. हा 'फिटिंग' शब्द त्यालाही चांगला समजतो. विद्यापीठातून शिकणा-यांना तर समजतोच आहे, पण त्याला डॉ. रघुवीर यांनी शब्द दिला आहे 'अन्वायुक्ति' आणि भारत सरकारच्या पारिभाषिक शब्दसंग्रहाच्या सुधारलेल्या आवृत्तीत शब्द आहे 'आसंजन'. 'फिटिंगची' ही दशा करून कुणाचा काय फायदा झाला? सुशिक्षित-अशिक्षित, तज्ज्ञ-अज्ञ सगळ्यांचेच हाल झाले, दुसरे

काय? दुसरा एक 'प्रुफ' हा शब्द घ्या. प्रुफ म्हणजे काय ते लेखकापासून कंपोझिटरपर्यंत सर्व संबंधितांना चांगले माहीत आहे. ज्यांचा संबंध नव्याने येईल त्यांनाही तो सुटसुटीत शब्द समजेल आणि लगेच पाठही होईल. आता इथे काही भारतीय प्रतिशब्दाची गरज आहे का? पण डॉ. रघुवीरसारख्यांना त्यासाठी 'ईक्ष्य' सारखा शब्द देऊन शिंकावेसे वाटतेच!

**अनेकार्थी शब्द**

परिभाषा अधिकाधिक बिकट करण्यामागे विद्वानांची पुष्कळदा काही विलक्षण विचारसरणी असते. कधी असे दिसते की, एखादा व्यवहारातील परिचित शब्द शास्त्रीय विवेचनासाठीही यथायोग्य असतो, पण अनेकदा तो केवळ तसा फार रूढ आणि परिचित आहे म्हणूनच विद्वानांना नको असतो की काय, असे वाटते. सामाजिक शास्त्रांच्या बाबतीत हे विशेषत्वाने दिसते. 'बदल' शब्द चालत नाही; 'स्थित्यंतर' किंवा 'परिवर्तन' म्हटले पाहिजे. असे कितीतरी शब्द दाखविता येतील. असे साधे नित्याच्या व्यवहारातले शब्द न घेता दुसरे भारदस्त शब्द निवडण्यामागे कधी असाही विचार असावा की, इतके साधे, सरळ, व्यवहारातल्या भाषेत जर आम्ही बोलत राहिलो तर मग आमची विद्वत्ता ती काय? पांडित्याचा दबदबा राखण्यासाठी अवजड भाषाच वाचकाच्या डोक्यावर मारली पाहिजे. 'एकाच वेळी' म्हणून कसे चालेल? चांगली 'एकसमयावच्छेदेकरून' अशी धाडधाड करीत मालगाडी गेली पाहिजे. हा दंभाचा भाग सोडला तरी, व्यवहारातले नित्याचे शब्द न वापरण्यास एक संयुक्तिक असे कारण दाखविता येईल. व्यवहारात एखाद्या शब्दाला रूढ असा अर्थ येऊन बसलेला असतो. उदाहरणार्थ, मराठीतील 'ताकद' ह्या शब्दाला नित्याच्या व्यवहारात माणसाच्या अंगातील ताकद असा काही अर्थ आहे. मग यंत्राची 'Capacity' म्हणायची असेल, तेव्हा हा 'ताकद' शब्द कसा चालेल? हा मुद्दा ठीक वाटला तरी, तो टिकणारा नाही. कोणत्याही भाषेत सामान्य व्यवहारात, शास्त्रीय विवेचनात आणि तसेच व्यवहार आणि शास्त्रविवेचन ह्या दोन्ही संदर्भांतही एकच शब्द अनेक अर्थांनी वापरला जातो; त्याचा अर्थ संदर्भावरून स्पष्ट होत असतो आणि घोटाळा होण्याचा संभव रहात नाही. उदाहरणार्थ, इंग्रजीत 'Writer' म्हणजे 'लेखक-ग्रंथलेखक'. परंतु त्याच शब्दाचा अर्थ 'कारकून' असाही होतो किंवा 'लेखनाचे पाठ देणारी पुस्तिका' अशा अर्थानेही हा शब्द वापरतात. संदर्भाप्रमाणे त्या शब्दाचा अर्थ–अभिप्रेत अर्थ– कळतोच. म्हणजे 'Bertramd Russell is a great writer' म्हणजे 'बर्ट्रांड रसेल हा थोर ग्रंथकार आहे' हे उघड आहे, 'बर्ट्रांड रसेल हा महान कारकून आहे' किंवा 'बर्ट्रांड रसेल म्हणजे एक श्रेष्ठ लेखनशिक्षणपुस्तिका आहे', असा अर्थ कुणाला लागणेच शक्य नाही. इंग्रजीतील 'Order' ह्या शब्दाचे हुकूम, व्यवस्था, क्रम असे कितीतरी अर्थ आहेत. वापरणा-याने तो शब्द विशिष्ट ठिकाणी कोणत्या अर्थाने वापरला आहे हे त्याचा रोख पाहून सहज समजते. शास्त्रविवेचनातसुद्धा काही शब्द अनेक अर्थांनी येतात. 'Ether' म्हणजे 'ढगापलीकडचा प्रदेश.' त्याच शब्दाचा दुसरा अर्थ 'सर्वत्र भरून राहिले आहे असे एक मानीव द्रव्य' आणि तिसरा अर्थ 'एक विशिष्ट रासायनिक पदार्थ.' 'Chemist' म्हणजे 'रसायनशास्त्रज्ञ'ही होतो किंवा 'औषधविक्रेता'ही होतो. असे शेकडो इंग्रजी शब्द दाखविता येतात. मराठीतही असे कित्येक शब्द आहेत. 'पाट' म्हणजे बसण्याचा पाट, पाण्याचा पाट, की एक प्रकारचा विवाहसंबंध हे वाक्याचा विषय लक्षात घेतला की, बरोबर समजते.. म्हणूनच एखाद्या शब्दाला व्यवहारात किंवा शास्त्रीय विवेचनाच्या अन्य संदर्भात काहीएक अर्थ आहे म्हणून तो दुस-या संदर्भात घ्यावयाचाच नाही, असे धोरण असण्याचे कारण नाही. इंग्रजीतही ज्या अनेक शब्दांना पुढे विशिष्ट पारिभाषिक अर्थ प्राप्त झाले, ते शब्द भाषेत पूर्वीपासून होतेच. जे होते तेच शब्द उचलण्यात आले आणि त्यांच्या व्यवहारातील अर्थाखेरीज अन्य विशिष्ट संदर्भांतही विशिष्ट अर्थाने पक्के झाले. उदाहरणार्थ, 'Rod' किंवा 'Shaft' हे इंग्रजी शब्द पहा. त्यांना मुळातले सरळ, साधे असे अर्थ आहेत. यंत्रे आल्यावर यंत्राच्या काही विशिष्ट भागांनाही हे दोन शब्द वापरण्यात आले आणि त्यांना त्या संदर्भात ठरावीक अर्थ प्राप्त झाले. 'Rod' किंवा 'Shaft' हे शब्द निरनिराळया सात-आठ अर्थांनी वापरले जातात आणि विषयाच्या संदर्भाप्रमाणे अमुक ठिकाणी








त्यांचा नेमका अर्थ काय हेही बोलणा-याला आणि ऐकणा-याला; लिहिणा-याला आणि वाचणा-याला दोघांनाही स्पष्ट असते.

**व्युत्पत्तीचा मुद्दा**

एखादा सोयीस्कर शब्द निवडताना विद्वानांना पुष्कळदा दुसरे एक संकट पडते. त्यांच्या विशेष अभ्यासामुळे त्या शब्दाचा मूळ अर्थ काही निराळाच आहे, हे त्यांच्या लक्षात येते आणि मग तो शब्द भलत्याच अर्थी कसा वापरावयाचा, असा त्यांना प्रश्न पडतो. ह्याबाबत असे म्हणता येईल की, शब्दांचे अर्थ बदलत जाणे हेही जगातील प्रत्येक भाषेच्या बाबतीतच झाले आहे. लोक जेव्हा तो शब्द वापरतात, तेव्हा त्या शब्दाच्या व्युत्पत्तिसिद्ध अर्थाचे किंवा मूळ अर्थाचे त्यांना अज्ञान तरी असते किंवा मूळ अर्थाची जाणीव असली तरी, रूढ आहे किंवा होऊ शकेल म्हणूनच तो शब्द निराळ्या अर्थाने ते वापरीत असतात. पुन्हा इंग्रजीतील शब्दाचेच उदाहरण घेऊन दाखवायचे तर एक अगदी नेहमीच्या प्रचारातला आणि शास्त्रीय परिषाषेतही पक्का झालेला 'Politics' हा शब्द घ्या. ह्या शब्दाचा मूळ ग्रीकमधील अर्थ काय? 'Polis' म्हणजे नगर. नगराच्या शासनाचा जो व्यवहार, नगरामधील शासकीय सत्ता आणि त्याबाबतच्या घडामोडी हे सगळे म्हणजे 'Politics'. तेव्हा पॉलिटिक्स हा शब्द व्युत्पत्तीने पाहिले तर आपण फक्त एखाद्या शहरातील व्यवहारापुरता हा शब्द वापरू शकू. परंतु आपण 'National Politics' म्हणतो, 'International Politics म्हणतो. 'Politics'चा मूळ अर्थ घेतला तर "राष्ट्रीय नगरव्यवहार" आणि "आंतरराष्ट्रीय नगरव्यवहार" असे काहीतरी विलक्षण अर्थ ह्या शब्दप्रयोगातून निघतील. परंतु तसे निघत नाहीत. तसा कुणाचा घोटाळा होत नाही. कारण व्युत्पत्तिशास्त्र जाणणा-या आणि न जाणणा-या सगळ्यांनीच 'Politics' हा शब्द 'राजकारण' ह्या व्यापक अर्थाने वापरण्याचे ठरविले आहे. आता 'Politics' विषयी मराठीत बोलताना आपण 'राजकारण' असे बोलत आहोत. परंतु राजकारणात आता राजे नाहीत. लोकशाही आहे; सत्ता लोकांची, लोकांसाठी वगैरे आहे; परंतु म्हणून आपण लगेच 'राजकारण' शब्द टाकून 'लोककारण' शब्द घ्यायला पाहिजे, असे मुळीच नाही. कारण राजकारण म्हणजे काय आणि तो शब्द आज आपण कोणत्या अर्थाने वापरीत आहोत, हे सर्व वापरणा-यांना चांगले ठाऊक आहे. चर्चिलने एकदा कोणतातरी एक नवीन शब्द वापरला. लंडनमधील इंग्रजी भाषेच्या एका गाढ्या विद्वानाने व्युत्पत्तिदृष्ट्या तो शब्द कसा चूक आहे, हे चर्चिलला दाखवून दिले. ह्यावर चर्चिल म्हणाला "ठीक आहे, चुकू दे. हाच शब्द मी आणखी दहा वेळा वापरीन म्हणजे तो बरोबर होईल" तेव्हा शब्दाचा रूढीने, वापराने जो अर्थ पक्का झाला, लोकमान्य झाला, तोच त्याचा अर्थ. दुसरा नाही. आणि म्हणूनच व्युत्पत्तीसारखे गैरलागू मुद्दे परिभाषेच्या संदर्भात येऊ नयेत.

**नवीन शब्दांच्या निर्मितीतील एक दृष्टी**

काही शब्द इंग्रजीतून जसेच्या तसे घेतले, काही व्यवहारातले आणि रूढ असे मराठी शब्द घेतले तरी कितीतरी नवीन मराठी शब्द बनवावे लागतील, हे खरेच. कारण विद्यार्थ्याला भाषेच्या बाबतील कमीत कमी श्रम पडतील अशा पद्धतीने जास्तीत जास्त ज्ञान उपलब्ध होईल, अशी दृष्टी ठेवावयाची आहे. तेव्हा जेवढे प्रत्यक्ष अर्थबोधक असे शब्द अधिक मिळतील, तेवढी ज्ञानार्जनात अधिक सुलभता येईल. नवीन शब्द बनविताना ही दृष्टी ठेवली गेली पाहिजे. पुष्कळदा मूळ इंग्रजी शब्दांचे आपण अक्षरशः भाषांतर करून नवीन मराठी प्रतिशब्द आणतो. मूळ इंग्रजीतला तो शब्द त्या विशिष्ट संदर्भात पुष्कळदा रूपकानेच वापरलेला असतो. त्याचा अर्थ तिथे समजून घेतला जातो. परंतु तो शब्द आहे तसाच घेऊन त्याचा पर्याय शोधण्यात काय फायदा? उदा., अर्थव्यवहारातील 'Inflation' ह्या प्रकारासाठी मराठीत पुष्कळदा 'फुगवटा' असा शब्द वापरण्यात आलेला दिसतो. 'फुगवटा' कसला? शरीरावर सूज येऊन फुगवटा येतो तो किंवा असा काही अर्थ धरावयाचा की काय? अर्थात तसा धरण्याचे कारण नाही. संदर्भाने 'फुगवटा' म्हणजे काय ते कळेल. परंतु 'फुगवटा' ऐवजी 'चलनवाढ' असा शब्दही आलेला आहे. तो अधिक चांगला; कारण त्या शब्दातून ती क्रिया किंवा तो प्रकार काय आहे. हे स्पष्ट होते. 'चलनवाढ' सारख्या अर्थसूचक शब्दाने ज्ञानार्जनाची क्रिया अधिक सोपी होते. म्हणून जेव्हा असे शब्द

मिळतील, तेव्हा इंग्रजीऐवजी पर्यायी मराठी शब्द अवश्य योजावेत. सर्वच शास्त्रकलांच्या परिभाषेतून असे अर्थपूर्ण शब्द अधिकाधिक प्रमाणात आणण्याचा यत्न केला जावा. मात्र जेव्हा असा अर्थबोधक शब्द मिळत नसेल, तेव्हा एका अपरिचित अगडबंब इंग्रजी शब्दाऐवजी दुसरा अपरितचत अगडबंब संस्कृत शब्द आणून काहीही साधत नाही. अशा वेळी मग निदान इंग्रजी शब्दाऐवजी येणारा मराठी प्रतिशब्द पूर्णतया अर्थबोधक नसला तरी निदान जीभ लुळी करणा-या इंग्रजी शब्दाऐवजी एखादा लिहायला, बोलायला सोपा असा मराठी शब्द येईल, असे तरी पहावे. उदाहरणार्थ, पुणे विद्यापीठाच्या भूशास्त्रीय परिभाषेत Tracks and trails साठी वापरलेले 'पाऊल ठसे, चाल ठसे' हे प्रतिशब्द उत्तम आहेत; परंतु 'Synclinorium' साठी 'संसंमुखनती' योजून कोणताच फायदा मिळत नाही, असे मला वाटते. त्याच शब्दसंग्रहातील 'Solifluction'साठी 'मात-लोट' हा शब्द एकदम पटला; पण 'Strike' साठी 'नतिलंब' का, ते मात्र समजत नाही.

**अधिकृत परिभाषेचा आग्रह नको**

एक सर्वसामान्य प्रमाणित अशी परिभाषा पक्की झाली पाहिजे आणि तीच न चुकता सर्वांनी वापरली पाहिजे; तसे झाल्याखेरीज मराठीत शास्त्रीय स्वरूपाचे लेखन पद्धतशीरपणे होऊच शकणार नाही. आधी सर्वसामान्य अशी एक आणि एकच निश्चित परिभाषा आणि मग लेखन असा काहींचा आग्रह आहे.

सध्या चारपाच विद्यापीठांतून मराठी माध्यमातून उच्च शिक्षण देण्याचा उपक्रम चालू आहे. ह्या सर्व विद्यापीठांना आणि इतर संबंधित संस्था आणि क्रमिक पुस्तकांचे निर्माते व इतर ग्रंथलेखक ह्यांना एकत्र आणून एक परिभाषा बसविणे आणि सर्वांनी न चुकता नेहमी विशिष्ट अर्थाने विशिष्ट शब्दच वापरणे; कुणी कुठे चुकला तर ते लगेच दुरुस्त होईल अशा त-हेची यंत्रणा निर्माण करून ठेवणे हे सगळे सहजगत्या शक्य होणार नाही; आणि बहुत प्रयत्नाने शक्य केले तरी त्याचा उपयोगही नाही. सध्या अनेकांना अनेक प्रकारचे शब्द मुक्तपणे वापरू देणे हेच श्रेयस्कर. शब्दांच्या जीवनकलहात जे समर्थ असतील ते टिकतील. कोणते शब्द रहावेत, कोणते जावेत हे काळच ठरवील. सध्या 'Physics'ला कुणी 'विज्ञान' म्हणतील, कुणी 'भौतिकी' म्हणतील, कुणी 'वास्तवशास्त्र' म्हणतील; म्हणू देत. वापरणारे हळूहळू एक शब्द पक्का करतील किंवा तिन्ही शब्द ठेवतील. एकाच अर्थी दोन-तीन शब्द असणे हाही प्रकार प्रत्येक भाषेत थोडाबहुत असतोच.

ह्याचा अर्थ असा नव्हे की, चार विद्वानांनी एकत्र बसून परिभाषा तयार करूच नये, जरूर करावी. पण ती होत नाही तोपर्यंत शास्त्रीय लेखनाचे काम अडू नये आणि जी परिभाषा कुणा एका समितीने तयार केली, तीच सर्वांवर ताबडतोब बंधनकारक व्हावी असे असता कामा नये, एवढेच येथे सांगावयाचे आहे. परिभाषेसंबंधी शिफारस करायला कुणालाच प्रत्यवाय नाही, पण त्या शिफारशीच असाव्यात. आपल्या मते अधिक चांगली परिभाषा तयार करण्याचा कोणाही व्यक्तीचा किंवा संस्थेचा हक्क कायम रहावा. असे अराजकच अंती हिताचे ठरेल.

ह्याने एवढेच होईल की, आणखी पाचपंचवीस वर्षे मराठीत जे लेखन होईल, त्यात काही ना काही परिभाषा असेल, पण परिभाषेची एकवाक्यता– किंवा एकशब्दता– असणार नाही. प्रत्येक लेखकास आपली परिभाषा स्पष्ट करावी लागेल. लेखन काहीसे ऐसपैस– क्वचित पाल्हाळिक–असेही होईल. आणि असे झाले तरी काही बिघडत नाही. ह्या अवस्थेतून गेल्यानंतर मात्र जी परिभाषा रुजेल, ती कोणत्याही प्रकारच्या कायद्याविना समाजाने आत्मसात केलेली असेल आणि शास्त्रीय लेखनात आपोआपच आवश्यक ती दृढता येऊ लागेल.

**परिभाषायोजनेतील हेतू आणि दिशा :**

निरनिराळ्या विषयांसाठी जी परिभाषा तयार करावयाची, तिच्यासंबंधी धोरण ठरविताना प्रथम ती कुणासाठी आहे, हे लक्षात घ्यावयास हवे. ज्यांच्यासाठी हा प्रपंच करावयाचा त्या लोकांची सर्वसाधारणपणे काय तयारी आहे, त्यांना कोणते शब्द कळतील, कोणते नवीन दिले तरी चालतील ह्या दृष्टीने विचार करता आजचा साधारण शिकलेला म्हणजे महाविद्यालयीन शिक्षण घेत असलेला किंवा पूर्ण करून नुकताच बाहेर पडलेलाही असा

नागरिक घेतला तर, भाषेच्या ज्ञानाच्या दृष्टीने तो कुठे उभा आहे, हे पाहिले पाहिजे. सबंध समाजात म्हणजे अगदी खालच्या थरातील व्यक्तींपर्यंतसुद्धा जे इंग्रजी शब्द पोचले आहेत ते ह्या शिक्षितालाही निश्चित ठाऊक आहेत. म्हणूनच 'टेबल', 'मोटार', 'ड्रायव्हर', 'रेल्वे', 'ऑफिस', 'क्लार्क', 'फाईल', 'डॉक्टर', 'इंजिनिअर', 'कॉलेज' इत्यादींसारखे जे हजारो इंग्रजी शब्द मराठीत पूर्णपणे सामावून गेले आहेत, त्यांसाठी प्रतिशब्द मुद्दाम निर्माण करण्याचे काहीही कारण नाही. असे आणखीही शब्द रूढ होतील. विमान हा शब्द मराठीत आहे; परंतु 'हेलिकॉप्टर', 'जेट', 'बोईंग' ह्या विमानांच्या प्रकारांना मराठी प्रतिशब्द बनविण्याचा उद्योग हाती घेण्याचे काय कारण आहे? पोरासोरांपासून सर्वांना हे प्रकार ह्या शब्दांसह पाठ होत आहेत. मूळ इंग्रजी शब्दाच्या आद्याक्षरांपासून बनलेले 'एस.टी'सारखे नवीननवीन शब्दही रूढ होतील. खेड्यापाड्यांतील लोकांनासुद्धा सरकारी मालकीची प्रवासी नेणारी मोटारगाडी ह्या अर्थी 'एस.टी' हा एक शब्द आता पक्का समजला आहे; किंबहुना तो त्यांनीच पक्का केला आहे. ('एष्टी' किंवा 'यश्टी' असे पाठभेदही आढळतात!) इंग्रजी शब्द आणि मराठी शब्द ह्यांचे मिळून बनलेले 'सायकलस्वार' सारखे कितीतरी सामासिक शब्दही दाखविता येतील. हे सगळे शब्द कसे बनले? का आणि कसे रूढ झाले? ह्याची बौद्धिक स्वरूपाची चिकित्सा करावयास हरकत नाही. केवळ भाषाशास्त्रीय अभ्यासाच्या दृष्टीने हे शब्द संमिश्र आहेत. अशुद्ध आहेत, धेडगुजरी आहेत असे काही म्हणावयासही हरकत नाही. परंतु परस्परव्यवहारात आणि विषयांच्या अभ्यासात हे शब्द अंतर्भूत करावयास मात्र कोणतीही हरकत घेतली जाऊ नये.

मराठी प्रतिशब्द बनविताना पुष्कळदा समाजामध्ये संस्कृतचे ज्ञान आहे त्यापेक्षा बरेच अधिक गृहीत धरलेले दिसते किंवा निदान ते नसेल तर ते तेवढे पाहिजे असा आग्रह तरी त्यात धरलेला असावा, असे वाटते. परंतु प्रत्यक्षात समाजात सध्याची स्थिती जी आहे ती लक्षात घेतली, शाळांतून व कॉलेजांतून किती विद्यार्थी संस्कृत शिकतात आणि ते कोणत्या दर्जाचे शिकतात ह्याची पहाणी केली तर, सध्या पारिभाषिक शब्द बनविताना संस्कृतचा ज्या प्रमाणात आधार घेतला जातो, ते प्रमाण योग्य ठरणार नाही. परिभाषा अशाच पद्धतीने बनवावयाचे धोरण चालू राहिले तर प्रत्येक नागरिकाला काही एका पातळीपर्यंतचे संस्कृतचे ज्ञान सक्तीचे करणे आवश्यक होईल. म्हणजे नवीन परिभाषेमुळे त्याला त्याचा विषय किती समजेल आणि किती नाही ते वेगळेच; परंतु संस्कृत मात्र घोकावे लागेल एवढे खरे. आता जे संस्कृत शब्द रूढ झाले आहेत, समाजात चांगले मुरले आहेत, त्यांच्याबद्दल अर्थातच आक्षेप नाही. परंतु नवीन संस्कृत शब्द आणताना मात्र आहे हा समाज आहे तसा स्वीकारून त्याला काय झेपेल, हा विचार केलाच पाहिजे.

परिभाषा योजनेत स्वाभिमान राखणे किंवा तो वाढीस लावणे अशांसारखे अवांतर हेतू येऊच शकत नाहीत. अमुक शब्द परकी म्हणून त्याज्य हा मुद्दाच चुकीचा आहे. आपण अंगात बुशशर्ट घालतो तो परकीयांचा, पाव खातो तोही परकीयांचाच. अशा अनेक बाबतींत परकी गोष्टी घेऊनही आपल्या स्वाभिमानाला काहीही होत नाही; तर लिहिण्याबोलण्यात परकी शब्द वापरण्याने काय व्हावयाचे आहे? इतिहासकालात अनेक परकी शब्द आले, आपल्या भाषेत घुसून घट्ट बसले. ते आपण मान्य केले. शेपन्नास वर्षे गेली की, भाषाशास्त्रज्ञही त्या शब्दांना स्वकीयच म्हणू लागतात. ज्या पद्धतीने पूर्वी अरबी, फारसी इत्यादी भाषांतील शब्द मराठीत शिरून मराठीच झाले, त्याच पद्धतीने ह्या काळात इंग्रजीसारख्या यूरोपीय भाषेतील शब्द मराठीत घुसून मराठी होत आहेत. त्यात आपले काय नुकसान आहे? झाला तर फायदाच होतो आहे आणि आणखी होणार आहे. मग त्याच्याबद्दल एवढा तिरस्कार कशासाठी? आपल्याला आपल्या बहुजन समाजाला शिकवावयाचे आहे, ज्ञानसंपन्न करावयाचे आहे; निरनिराळ्या शास्त्रकलांशी त्याची ओळख करून देऊन पुढील प्रगतीसाठी त्याला योग्य मार्गावर नेऊन सोडावयाचे आहे. त्याच्या हिताच्या दृष्टीने परिभाषेसंबंधीचे धोरण ठरले गेले पाहिजे. त्याला विविध विषयांतील ज्ञान मिळविणे ज्यामुळे सुलभ होईल, ती आमची परिभाषा असावी. त्यात इंग्रजी शब्द कायम रहावेत, रूढ व्यावहारिक मराठी शब्दही घेतले जावेत. व्याकरण, व्युत्पत्ती इत्यादींचा

विचार न करता रूढ झालेले किंवा सोईस्करपणे रूढ करता येतील असे शब्द वापरले जावेत; अर्थबोधक असे सोपे, सुटसुटीत नवीन शब्दही तयार करण्यात यावेत आणि कधी तर, अवजड इंग्रजी शब्द पेलणार नाहीत म्हणून पुरेसे अर्थबोधक नसले तरीही सुटसुटीत सोपे असे शब्द घेतले जावेत. एकूण ज्याला शिकवावयाचे आहे त्याला ज्ञान अधिकाधिक सुगम होईल ह्या दृष्टीने आणि केवळ ह्याच दृष्टीने आमची परिभाषा तयार झाली पाहिजे. त्यात अन्य कोणत्याही विचाराला जागा नाही.

ळळळ

जुने लेखन

# सुधारणारहस्य

## अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोताच दुर्लभः

### (प्रस्तावना.)

**सुधारका**च्या पुनरुज्जीवनाच्या प्रसिद्धीपत्रकांत 'हितचिंतकांचे अभिप्राय' त्या सदराखाली रा. रा. न. चिं. केळकर यांनी दिलेला अभिप्राय बहुधा वाचकांच्या पहाण्यांत असेल. त्या अभिप्रायांत ध्वनित केलेली सुधारकाबद्दलची तक्रार त्यांच्यापुरतीच मर्यादित नसून तिची व्याप्ति बरीच विस्तृत आहे हें आम्ही जाणून आहों. आणि म्हणून तिची वेळींच थोडीशी शहानिशा करणें आम्हांस अगत्याचे वाटतें. रा. केळकर लिहितात की, "सुधारणाप्रतिपादनांत समाजाच्या मनाच्या अनुनयाचा विचार डोळ्यांपुढे ठेवल्यानें हेतु सिद्धीस जाईल." याचा स्पष्ट अर्थ हाच आहे की, सुधारकाच्या पूर्व अमदानीत त्याने आपल्या सुधारणेवरील लेखांत समाजाच्या मनोवृत्तीबद्दल पूर्ण बेपर्वाई दाखविली आहे; समाजाचे मन न दुखेल अशाबद्दल कधीही काळजी केलेली नाही. आणि हेंच त्याच्या अप्रियतेचे कारण आहे. तेव्हां **सुधारका**चे कार्य लोकप्रिय व्हावें अशी इच्छा असेल, तर ते समाजाच्या मनास धक्का न बसेल अशा गोडीगुलाबीच्या मार्गाचा अवलंब केल्यानेच साधणारे आहे." रा. केळकर यांचा हा उपदेश सद्‌हेतुप्रेरित आहे, याबद्दल आम्हांस काडीइतकीही शंका नाही. परंतु तो अमलांत आणणें सकृत्‌दर्शनी वाटते तितके सोपे नाही, हीच काय ती मोठी अडचण आहे. समाजावर यथेच्छ तोंडसुख घेणे, अथवा जाणूनबुजून समाजाचें मन दुखविणे हे सुधारकाचे आताही उद्दिष्ट नाही, अथवा ते पूर्वीही कधी नव्हते. त्याची मतें अथवा विचारसरणी ज्यांना अद्याप मान्य झालेली नाही, त्यांना ती उत्तरोत्तर संमत होत जावी, हेच काय ते त्याचे उद्दिष्ट असणे शक्य आहे. आणि हे जर खरे आहे तर, ज्या समाजाची अनुकूलता त्याला संपादावयाची आहे, त्याच समाजाचा जेणेकरून आपणावर रोष होईल, असे आत्मघाती वर्तन जाणूनबुजून त्याच्या हातून घडणे हे केवळ असंभवनीय असले पाहिजे. यावर कोणी विचारील की, मग सुधारक अजूनही लोकांस अप्रिय कां वाटावा? तर त्याचे उत्तर 'अप्रिय पण पथ्यकर असें बोलणारा जसा विरळा तसाच ऐकणाराही विरळा,' या अर्थाचे जे अनुभवसिद्ध संस्कृत सुभाषित या लेखाच्या आरंभी दिले आहे, त्यातच सापडणारे आहे. तेव्हा समाजाच्या मनाच्या अनुनयाचा विचार सुधारकाने एकसारखा डोळ्यांपुढे तेवत ठेवला. तथापि त्याचे प्रतिपाद्य विषयच जर मुळी समाजाला रूढीप्रेमामुळे अप्रिय वाटणे केवळ स्वाभाविक आहे, तर त्याच्याविषयी समाजाच्या मनांत थोडीफार अप्रियता असणे हेंही अपरिहार्यच असले पाहिजे. तात्पर्य, सुधारकाच्या अप्रियतेचे बीज त्याच्यावर आरोपित केलेल्या समाजमनोवृत्तीसंबंधाच्या त्याच्या बेफिकिरीत नसून, प्रतिपाद्य विषयांच्या अप्रियतेतच आहे यांत संशय नाही. तेव्हा लोकाराधनेचा अथवा लोकछंदानुवर्तित्वाचा मार्ग स्वीकारावयाचा म्हटले तर लोकांना न रुचणा-या विषयांची चर्चा करण्याचे अजिबात सोडून दिले पाहिजे आणि ती चर्चा करण्याचे सोडून देणे म्हणजे सुधारकाने आपले ब्रीदच सोडून देण्यासारखे आहे. आणि ते ब्रीद सोडून दिल्यावर मग त्याचे सुधारकत्व ते कोठे राहिले? आणि सुधारकत्वच जर नाही, तर त्याचे पुनरुज्जीवन तरी कसले?

**सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात् सत्यमप्रियम्।**

म्हणजे 'लोकांना प्रिय होण्यासारखें असेल तेवढेच सत्य बोलावें, परंतु अप्रिय होणारे सत्य कधीही बोलू नये,' हा 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति'चा लोकानुनयाचा मार्ग जे लोकप्रियतेलाच हपापलेले असतील त्यांनी खुशाल अंगिकारावा; ज्यांना लोककल्याणाची खरी खरी कळकळ असेल, त्यांनी त्याचा कधीही अवलंब करता कामा नये.

वास्तविक पहाता ही लोकानुनयाची मात्रा व तिचे हे धन्वन्तरी आजकालचे नाहीत! लोकांना परिचित नसल्यामुळे अप्रिय वाटणा-या विषयांची चर्चा करण्याचा ज्यांनी ज्यांनी उपक्रम केलेला आहे, त्यांना त्यांना त्यांच्या हितचिंतकांनी या मात्रेचे वळसे पाजण्याचा प्रयत्न केलेला

आहे, हे जॉन स्टुअर्ट मिल्ल यांच्या 'स्वातंत्र्य' नांवाच्या सुप्रसिद्ध ग्रंथांतील भाषांतररूपाने दिलेल्या पुढील अवतरणावरून सहज दिसून येईल.

"कित्येक म्हणतात की, वाटेल ते मत प्रतिपादण्याची सर्वांना पूर्ण मुभा असावी हे खरे, पण ते प्रतिपादणारांनी नेमस्तपणा राखला पाहिजे व वादविवादाच्या शिष्टसंमत मर्यादेचे उल्लंघन होऊ देता उपयोगी नाही. पण तो नेमस्तपणा अथवा ती मर्यादा सुटली किंवा न सुटली, हे ठरविणे आधी बहुतेक अशक्यच. प्रतिपक्षीयाचे मन न दुखवणे ही जर त्या मर्यादेची कसोटी मानावी, तर त्या मर्यादेचे ज्याच्या हातून उल्लंघन होत नाही असा एकही सुधारणाप्रतिपादक दाखविता येणार नाही. कारण नेहमीचा अनुभव पाहिला तर असे दिसते की, जों जों सुधारक प्रतिपक्षीयांच्या मताचे अधिकाधिक जोराने खंडन करितो व त्याला अधिकाधिक निरुत्तर करून सोडतो, तों तों त्यांच्या तो अधिकच रोषास पात्र होतो व त्यांच्या मतानें अधिकच जहाल ठरतो. आता प्रतिपक्षीयांवर शिव्यांचा वर्षाव करीत सुटणे, त्यांची टर उडविणे, त्यांतील व्यक्तीस अनुलक्षून बोलणे, हे शिष्टसंमत मर्यादेचे उल्लंघन मानून त्याचा सर्वथा निषेध करणे योग्य होईल, यात संशय नाही, पण ते नुसत्या सुधारकपक्षापुरते असता कामा नये. ते रूढ मताभिमान्यासही लागू झाले पाहिजे. पण वस्तुस्थिती अशी आहे की, असल्या दोषांबद्दल रूढमताभिमान्यास कोणी नावें ठेवीत नाही. इतकेच नाही, तर त्यांची उलटी 'शाबास', 'शाबास' म्हणून पाठच थोपटली जाते आणि आपली अल्पसंख्या, आपल्या मतासंबंधाने समाजाच्या मनात असलेली अढी वगैरे मनात आणून उपरिनिर्दिष्ट साधनांचा अवलंब करणे म्हणजे आपल्याच हातांनी आपल्याच पायावर धोंडा मारून घेण्यासारखे आहे हें जाणून जे स्वाभाविकपणेच त्या दोषापासून दूर असतात, त्यांच्यावरच या शिष्टाचारपालनोपदेशाचा चोहींकडून वर्षाव होत असतो. परंतु खरे पहाता अशा उपदेशाची जर कोणास अधिक जरूरी असेल तर ती रूढमताभिमान्यासच होय."

तात्पर्य, वरील सर्व मुद्द्यांचा विचार करता सुधारकावर येणारे आक्षेप बहुधा 'नावडतीचे मीठ अळणी' म्हणतात त्यातीलच एक प्रकार होय, असे मोठ्या कष्टाने म्हणावे लागते. सामान्यतः समाजास प्रथमदर्शनी तरी साहजिकपणेच अप्रिय वाटणा-या अशाच विषयांचा ऊहापोह करणे आम्हांस कर्तव्यप्राप्त असल्यामुळे, समाजाच्या मनास थोडाफार धक्का बसविण्यावाचून आम्हांस गत्यंतर नाही हे खरे. तथापि तसे करण्यात आम्हांस मोठी मौज वाटते म्हणून आम्ही ते करतो, अशी नुसती शंकाही वाचकांनी आपल्या मनास शिवू देऊ नये. साधु तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे

**कठिण देता काढा। जल्पे रोगी मेळवी दाढा।।**
**वैद्या भीड काय। आततायी जीवें जाय।।**

या विचाराने समाजाचे कल्याण डोळ्यापुढे ठेवून आम्हास मोठ्या दुःखाने ते कटुकर्तव्य करावे लागते. कै. आगरकर यांच्या शब्दांनीच सांगावयाचे म्हटले, तर "आपल्या अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छळास न भिता, त्यांच्याशी कधी भांडून, कधी युक्तिवाद करून, कधी लाडीगोडी लावून, अथवा सामर्थ्य असल्यास कधी त्यांस दटावून, त्यांची सुधारणा करीत राहणे यांतच खरी देशप्रीती, खरी बंधुता, खरा देशाभिमान, खरे शहाणपण व खरा पुरुषार्थ आहे." लोकछंदानुवर्ती होऊन सवंग लोकप्रियता संपादण्यात तो नाही, अशी आमची समजूत आहे, व तिच्या धोरणानेच म्हणजे,

**निंदन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु**
**लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम्।**
**अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा**
**न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः।।**

या सर्वथा श्रेयस्कर उपदेशानुसार आम्ही यथाशक्ति आपला मार्ग आक्रमीत राहणार व तोच आमच्या हेतूच्या सिद्धीस साह्यकारी होईल असा आम्हांस दृढ भरवसा आहे.

[**टीप** :- सी. ग. देवधर हे गोपाळ गणेश आगरकर यांचे सहकारी होते. आगरकरांचा सुधारक आगरकरांच्या मृत्यूनंतर काही दिवसांनी बंद पडला. त्याचे पुनरुज्जीवन देवधरांनी १९१४ साली केले व त्यात 'सुधारणा-रहस्य' ही लेखमाला १९१४-१५ साली लिहिली. त्याची ही प्रस्तावना. – संपादक]

ঔঔঔ








**पुस्तकपरीक्षण :**

# संवेदनालक्ष्यी कविता : उजेड गाभा-यातला

अेकनाथ पगार

'उजेड गाभा-यातला' ह्या बाळकृष्ण सोनवणे यांच्या कवितासंग्रहातील कविता स्त्रीरूपाशी संवाद साधतात. येथील निवेदक स्त्रीरूपाचे आत्मरत चिंतन करतो. स्पर्शसंवेदना, दृक्‌संवेदना, श्रुतिसंवेदना जाग्या करतो. आत्मपर गूढ भावानुभवात स्त्रीरूपाला आकर्षून घेतो. 'तू'चे कल्पनापूर्ण असे रूप सौंदर्यवादी नजरेने मांडतो. 'तू' हे स्त्रीरूपच स्वप्नसाक्षीत्वाने मांडत राहतो. कवितानिर्मिती आणि 'तू'ची तृष्णा यांची संवादी प्रक्रिया अनुभवणे व मांडणे ही काव्यप्रेरणा येथे प्रकर्षाने जाणवते.

(२)

मिलनोत्सुकता-तृष्णा यांचे आत्मप्रकटीकरण येथे संवादात्मक कविता बनते. हा संवाद एकतर्फीच आहे. 'मी' स्वतःच्या कल्पित स्त्रीअंगाशी बोलतो. पार्वतीपरमेश्वराचे एकात्म आविष्कारण येथे आहे. स्वनिर्मित आणि 'स्व'च्या ठायी वसलेल्या स्त्रीरूपाला आवाहन केले जाते, याचना केली जाते. स्पर्शाची असोशी उघडउघड सांगितली जाते. आपले व्यवहारी अस्तित्व स्त्रीरूपाच्या चिंतनातून कल्पित संपूर्णत्व धारण करते. ही प्रक्रिया काव्यनिर्माणक ठरते. एकचतुर्थांश कविता (सुमारे २२) या स्त्रीरूपाच्या आकर्षणाचे काव्यात्म चिंतन आहेत. कविता आणि स्त्रीरूप यांचे संधारण एकत्र–एकाच वेळी–झाले आहे. कवितेसंबंधीच्या या कविता आहेत. उदा., 'मला करता येते कवितेच्या डोळ्यांची उघडझाक/वेदनेच्या उन्हाला असू दे लाखभर पदर' (पृ. ५), 'आत्म्यावर उठला तरंग। भरताना देहगंध। वक्षात कवितेच्या' (पृ. २०), 'आपण झालो एकरूप....। ओठावरल्या शब्दांना आला बहर। उधळले रंग आणि गंध। आसक्तीच्या फुलांचे। कविते–कवितेतून' (पृ. २२), 'मी पोहचेन देहातीत। कवितेच्या पाऊलांनी तुझ्यापर्यंत' (पृ. ६१), 'कवितेच्या देठापासून दिलीय हाक। तू ये। बोट धर माझं। नुसतं कवितेत सोडलं। तरी चालेल' (पृ. ६२), 'जवळ ये, इतकी जवळ...होरपळून नीघ। कर धारण कवितेचा व्रण माझ्या। तू ये जवळ माझ्या' (पृ. ७१), 'आपण गुंतल्याचं बळ। उमलून येतं शब्दांत। मी वल्हवतो होडी। कवितेच्या नितळ पाण्यात। तुझ्या वाटेवरचा उजेड। अंगभर लपेटून घेताना। सापडतो निवारा' (पृ. ८४). 'तू' आणि 'कविता' यांना एकरूप करताना होणारी उलघाल, दुरावा, वेदना, स्पर्शाची उत्सुकता, भेटीसाठीचे व्याकूळपण या कवितांमध्ये केंद्रवर्ती आहे. स्त्रीरूपाचे सौंदर्यवादी भावनेतून चिंतन करणे, एक स्वप्नदृश्य उभारणे, एकतर्फी आत्मरतीचे दर्शन घेणे असे जवळपास सर्व कवितांमध्ये घडले आहे. यावरून असे लक्षात येते की, ह्या कविता स्त्रीरूपाच्या आसक्तीचे तीव्रतम संवेदन निर्माण करतात. दुरावा संपण्यासाठी, वेदनेतून मुक्तीसाठी सातत्याने याचना–प्रार्थना यांचा पवित्रा घ्यावा लागतो. एककेंद्री आशयसूत्र एकच सुरात आळवले जाते.

(३)

पुराणकथांच्या पौराणिक काळाला वर्तमानात चिंतनस्वरूप देणा-या संकेतांचे आधिक्यही जाणवते. गूढ-धूसर शिल्प-मंदिराच्या वातावरणात वावरावे लागते. 'प्रार्थना, नित्यपाठ, मंदिर, गाभारा, प्रसादाची वाटी, चिरंतन दैवदत्त भिक्षा, सायंकालीन दिवे, स्वराभिषेक, दीपमाळ, भूपाळी, सुवर्णकळस, स्पर्शसूक्त, सहस्रावर्तन, बिल्वदल' असे अनेक संकेत' मंदिर-भिक्षा-बैरागी' यांच्या सान्निध्यात नेतात. पौराणिक काळातले आदिम आकर्षणाचे वातावरण गूढरम्य बनते. स्वप्नांच्या आकांक्षाच प्रकटतात. कोणा एका अपार्थिव दैवी स्त्रीरूपाच्या आराधनेची, आकांक्षेची पुन्हापुन्हा आवर्तने होत आहेत, असा 'भास' या कवितांमध्ये येतो.

(४)

कल्पित-पौराणिकतेचा असा गूढ प्रत्यय ग्रेस यांच्या कवितांमध्येही आहे. स्त्री-देहाचे, मनाचे आत्मरत चिंतन चिरंतनपणे ग्रेस यांच्या कवितांमध्ये चक्राकार गतीने होते,

अनुक्रमणिका

हे स्मरण जागवणारे काही संकेत येथे आहेत. उदा., 'घुबडाचं तोरण, सायंकालीन दिव्याचा कातर आवाज, स्तनांच्या कुशीत। तेवत आण दिवा, विकारी बैरागी, गंधविरले स्वर, प्रार्थना, डोंगरापलीकडे उगवणारा आशादायी चंद्र, सोड केस मोकळे पडवीत मंदिराच्या, कवितेच्या स्तनाग्रावर ठेवून जिव्हा' या त-हेचे शब्दसंकेत ग्रेस यांच्या स्मरणाला उजाळा देतात.

(५)

विशेषणांचा वैशिष्ट्यपूर्ण आणि भरपूर वापर करणारी काव्यात्म विधाने येथे फार मोठ्या प्रमाणावर आहेत. अनेकार्थतेसाठी, अर्थसंमिश्रणासाठी आणि अर्थभ्रमणासाठी विशेषणांचा जोरदार वापर करण्याचा हा प्रयत्न आहे. उदा., संभ्रमाचा वारा, करुण दिवस, चटकेदार ऊन, दग्ध टोकदार ऊन, देदीप्यमान किरिट, सुगंधी रस्ता, तकलादू वस्त्र, पदन्यास तरल, पंखवैभवी पिसारा, तगमगता देह, विरक्तीचं विरल वस्त्र, निष्ठेचे वस्त्र, निष्ठावंत दुःख, स्पर्शाची शिडी, आसमंत काळा, आशादायी चंद्र, गर्भासक्त घरटी, शुष्क बाभळी, गद्दार पाखरं, मेघल सावळी (सावली), फकीर शहाणा, दवभरली पहाट, दवभरल्या कविता, संततधार प्रार्थना, चंदनवर्खी प्रार्थना, सुनाट गोठा, बेदर्दी पाऊस, बेदखल पाखरे, निबीड अंधार, चौसोपी अंधार, रतिरंगी वारा. एकेक, दोन-दोन विशेषणे येथे आहेत, पण आता पुढील शब्दबंध पाहू. सर्जनशील शारीर चूल, वासनेचा रुचकर स्वयंपाक, कुमारार्त केसांचं चविष्ट दैहिक गवत, सोनचाफी शब्दशरांचे तळ, कोमल सर्वस्पर्शी वेल, भोगाचा निरामय विश्वासू शंखध्वनी, निरभ्र, नितळ अनंत मोकळं निळंभोर आकाश, श्रीमंत ललाटवक्ष ओटीत, गार हिरवंगर्भ स्वप्न, सुरक्षित मोहमयी स्वप्नांची आरास, थेंबभर इवला प्रकाश, निष्क्रिय पाठमोरी व्यवस्था, दैहिक निःसंदिग्ध तहानलेली हाक, लालभडक रक्त चुटूचुटू चाटून इत्यादी नामासाठी, क्रियेसाठी वापरलेली विशेषणे वर्षावासारखी ओसंडू लागली की, अर्थसंभ्रम होण्याची शक्यता असते. विशेषणांचा जमाव हे एक प्रकारे असांकेतिकीकरणाचे, ध्यानाकर्षणाचे तंत्र ठरते. 'चंदनवर्खी प्रार्थना' असा शब्दबंध आहे. प्रार्थना कशी? तर 'चंदनवर्खी'. या 'चंदनवर्खी'च्या उपयोजनातून अमूर्तीकरण घडते किंवा 'चंदनवर्खी' या विशेष गुणाचा व्यक्तिपरत्वे वेगवेगळा भावार्थ होणार. अर्थविस्ताराबरोबरच अर्थविसर्जनच होऊ लागते. 'दुःखवैभवी अश्रू, स्तनवैभवी छाती' या शब्दबंधांचेही असेच धूसर पदन्यास-अर्थविन्यास-निर्माण करतात. 'कोरडे ओठ', 'व्यर्थ हात', 'प्रामाणिक प्रार्थना', 'व्याकूळ वारा', 'हिरवी फांदी', 'आर्त हाक', 'विकल चेहरा', 'उबदार उजेड', 'पांढुरका ठिपका', 'तीक्ष्णतम पातं' अशा विशेषणांच्या वापरात मात्र अर्थविस्ताराची शक्यता संपलेली दिसते.

म्हणजेच 'उजेड गाभा-यातला' या संग्रहात बाळकृष्ण सोनवणे यांना स्वतःची काव्यभाषा घडवायची आहे. त्यासाठीचे शब्दसंकेत ते घडवीत आहेत. आदिमतेला, अभिजाततेला वर्तमान काव्यभाषेत उभे करीत आहेत. स्वतःची काव्यभाषा, काव्यसूत्रे त्यांना सापडलेली आहेत.

(६)

'तू' हेच 'मी' चे चिंतन व संकल्पना यांचे केंद्र आहे. 'तू' दुरावली असल्याने या दुराव्यातून 'मी'मध्ये ओढ, तृष्णा, कामना यांची निर्मिती झाली आहे. 'तू' आणि 'मी' यांचा एकत्र असण्याचा एक गतकाळ आहे. वर्तमानात ह्या गतकाळाचे – 'तू' चे– पुन्हापुन्हा संरचन होत जाते. आजूबाजूला 'आता' आहे असा स्वप्नानुवर्ती वर्तमान निर्माण केला जातो. 'तेव्हा' आणि 'आता' यांत अंतर असल्याची दुःखी भावदशा या कवितांमध्ये दिसते. 'सहेतुक प्यायलीस माझ्या सभोवतीचा वारा' (पृ. १) ही पूर्वीची स्थिती 'तू' चे होकारात्मक रूप ठरते. ही 'तू' महत्त्वाकांक्षी आहे, तिला महत्त्वाकांक्षा आहे 'मी'च्या समवेत असण्याची, सर्जनक्षणांच्या निर्मितीची, संगाची! पण दैवरेखा शोषली जाते, 'तू' दुरावा सोसते, खिन्न बनते, दुराव्याची वेदना तिलाही जाणवत असल्याची भावना 'मी' ची बनते 'मी' ची अनुपस्थिती 'तू' ला खूप सलते, वियोगाचे युग तिला वाटते. 'मला तू हवी आहेस! आणि तुला 'मी' असा विश्वास 'मी' चा आहे. 'तू' सामान्यतः पुढील उल्लेखांमधून कळते, जाणवते– 'तू सोशिक बन' (पृ. ८), 'तू आहेस व्याकुळ माझ्याशिवाय' (२३), 'गोंधळली आहेस माझ्याशिवाय' (११), 'विरक्तीचं वस्त्र ल्यालेली' (११), 'तू संमोहित करून सोनचाफी शब्दशरांचे तळ ढवळले' (पृ. ३), 'चेह-यावर करुण दिवसांचं

पार्थिव आभाळ', 'तू भोगांची कोवळी सावली सांडलीय, तरल तनू पालवी' (पृ. २१), 'तू दिला रंग तनामनाला' (पृ. २२), 'तू माळून मला। मिरवला रुद्राक्ष स्तनवैभवी। छातीवर तुझ्या', 'कोरड्या पडत चाललेलया नदीची काळजी करते' (पृ. ४१).

व्याकूळलेले, गोंधळलेले, मिलनोत्सुक, विरागी, करुण, आकर्षक-मोहक, सर्जनोत्सुक, विरही असे हे स्त्रीरूप आहे. संमोहित करणा-या रूपापेक्षा विरहार्त रूपदर्शनच आधिक्याने घडते, 'मी' ने निर्मिलेले, त्याला जाणवलेले, भावलेले हे स्त्रीरूप 'सखी' – 'दुरावलेली सखी' या कवितांमधून मूर्तिमान होते. 'तू' चे प्रतिसाद फारसे नाहीत. जे आहेत, ते सारे वेदना-विरहाच्या भावनांचे आविष्करण. 'मी' ला 'तू' आता अप्राप्य झाली असावी, तिच्या सभोवताली वास्तवाचे ऊन आहे, तिची स्थिती केविलवाणी झाली आहे. म्हणूनच कल्पित 'भोगांची कोवळी' सावली असे भास प्रकट झालेले आहेत.' 'मी'चे सर्जनशील अस्तित्वरूपच 'तू'मधून उद्‌भवलेले आहे. 'मी पहातो सायंकाळी' या कवितेतील अखेरचा भाग पाहू–

मोहमयी शब्दांच्या
सुवासिक फुलपंखी पाकळ्या
उधळत तुझ्याइतकीच
प्रामाणिक प्रार्थना
साकारते तू
निरव ओवरीत
मंदिराच्या

तू उजळलाय
यथार्थाचा गाभारा
मनाच्या पारदर्शी
कंगो-यासारखा
माझा (पृ. ७०)

कविमनाच्या नेणिवेतील हे 'तू'–स्त्रीरूप त्याला जाणिवेच्या पातळीवर आणू पाहतेय. आदिम काळापासूनचे स्त्रीप्रतिमेचे प्रत्यक्षगत होणे, येथे घडते. 'मोहमयी शब्द', 'निरव ओवरी', 'मंदिर', 'गाभारा' हे शब्दबंध आदिम स्त्रीप्रतिमेचे निदर्शक आहेत. 'सुवासिक फुलपंखी पाकळ्या', 'केशरी आसमंत' हे संकेत 'मी'ची कामभावना दर्शवितात नेणिवेच्या स्तरावर वावरण्यातून मध्येच हळूहळू जागे करणे, उजेडाकडे जाणे, प्रत्यक्षगत वास्तवाचे भान येणे, असे काहीसे घडते. हे घडवून आणणारी ही स्त्रीप्रतिमा आहे. निवेदक 'मी' च्या मानसपातळीवर सारेकाही आकारित होत असावे. दृक्संवेदन प्रकट करू पाहणारी ही कविता स्त्रीरूपाच्या आदिम अस्तित्वाला उजाळा देणारी आहे.

(७)

आत्मरत होत सौंदर्यवादी भावनांचे आविष्करण करणा-या या कविता आहेत. या आत्मपरतेच्या मुळाशी स्त्रीरूपाचे आकर्षण आहे. कामभावाचे संयमी प्रकटन आहे. स्वप्नदृश्यं उभारणारी, गूढरम्य वाटणारी ही कवितानिर्मिती मोहक आहे. दृक्संवेदन, स्पर्शसंवेदन यांच्या उत्कट प्रत्ययाच्या आधारभूमीवर कामभावसंवेदन आहे. आत्मपर भावकाव्य म्हणून या कवितांची ओळख पुढे येत आहे, आली आहे.

**उजेड गाभा-यातला**
बाळकृष्ण सोनवणे
सुजय प्रकाशन, धुळे,
सप्टेंबर २०१५,
पृष्ठे ८७,
किंमत रु. १००/-.

## लेखकांचा परिचय

### ▣ डॉ. माधवी देसाई

शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागात प्राध्यापिका. ग्रेस यांची कविता : स्वरूप शोध (संध्याकाळच्या कविता आणि चंद्रमाधवीचे प्रदेश या कवितासंग्रहांच्या अनुषंगाने या विषयावर एम. फिल. पदवी). पु. शि. रेगे आणि ग्रेस यांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा या विषयावरील शोधप्रबंध पीएच. डी.साठी सादर. विविध नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.

***पत्ता :–*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली - ४१६४१६.
भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६.

### ▣ श्री. के. वनपाल

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरूवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

***पत्ता :–*** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७.

### ▣ श्री. बाबूराव चंदावार

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक. गांधीवादी विचारक आहेत. ते श्री. जयप्रकाशजी यांचे सहकारी होते.

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

### ▣ प्रा. श्री. मा. भावे

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.
दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

### ▣ श्री. अेकनाथ पगार

गेली ३३ वर्षे मराठीचे कर्मवीर रामरावजी आहेर महाविद्यालय, देवळा येथे अध्यापन.

***पत्ता :–*** मु. पो. देवळा, ता. देवळा, जि. नाशिक ४२३ १०२...

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

